## Selection No. 40.

### *MISCELLANEOUS PAPERS OF BALAJI BAJIRAO.*

This selection brings together a number of important papers which came to light after the previous selections had been arranged and sent to the press. They refer to the various events with which the regime of Peshwa Balajirao is so full—the conquest of the Karnatak, the early history of Ramraja (29) and his struggle for power No. 65, and the pilgrimage of the Peshwa's mother, Kashibai. The rivalry that long existed between the Peshwa and Babuji Naik Joshi for the possession of the Karnatak is a subject which has already been dealt with in Selection No. 25 and which will be found further cleared in some papers reproduced in this selection, viz., Nos. 28, 33-35, 45, 48, 52 and 53. No. 28 in particular, being a sanad granted to Babuji by King Shahu, seems to point to the origin of the dispute. A few papers of the previous regime are also included as they throw light on the conquest of the northern Konkan, as far as Jawhar and Ramnagar first projected by Bajirao in 1724 and completed as late as 1759. The letters of Krishnarao Chaskar, Balajirao's maternal uncle who was for a time entrusted with the task, will be found full of interest. Nos. 79 and 86 show how the Peshwa and Tulaji Angria gradually came to a clash. The last few letters No. 129, 132, further elucidate the preparations made by the Peshwa for resisting the Abdali, a task for which Raghunathrao was already appointed and which at the last moment came to be entrusted to Sadashivrao, at the famous meeting at Patdur. Although these papers are styled miscellaneous, they are by no means less important historically.

No. 1] [11-8-1724

तालिक

श्री

राजश्री सटवोजी जाधव गोसावी यासी

ॐ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो। बाजीराऊ बलाल प्रधान आर्शीर्वाद सुहूर सन खमस अशेरन मया अलफ. जवार व रामनगर व पेठ व वासंदे हे च्यारी संस्थानें व परगणे घणदिवी ऐसे स्वराज्यामधे आहेती. तेथील अमल स्वराज्याचा व सरदेशमुखीदेखील व याखेरीज सुरतप्रांतीचे माहाल वगैरे तापीपार आहेती. त्या महाली बाबती व सरदेशमुखीचा अमल जाला पाहिजे याकरितां सदरहू स्वराज्यामधे पांच स्थलेयाचा अमल देखील सरदेशमुखी व सुरत प्रांत व तापीपार परगणे याचा बाबती व सरदेशमुखीचा अमल यैसा मामला तुमच्या स्वाधीन केला असे. तुम्ही इमानें इतबारें वर्तोन जबरदस्तीने जाबिता बसऊन अमल बैसवणे. कुल बाब जमा आंकार करणें त्यापैकीं जमेती व ठाणी व महाल मजकूर देखील खर्चाचा व रसदी[१] यैवज हुजूर स्वारी मजकुरी पावा-वयाचा तह:—

जवार व रामनगर व पठे व वासदे व परगणे घणदिवी हे स्वराज्यामधी आहेती. याचा अमल तुम्ही करणें. मुल्कार्ची जमा व जकायेती बंदर पाणघाट व खुसकी व कमाविश बाब देखील आकार करणे. तो ऐवज व त्या यैवजाचे जमेस सरदेशमुखीचा वसूल दरसंदे रुपये १० दाहाप्रमाणे रयती निसवतीने वसूल घेणे. येणेप्रमाणे यैवज वसूल घेऊन जमा करणे. त्यापैकीं दोनी तकसिमा यैवज जमेती व गड व ठाणी व माहल मजकूरच्या खर्चास तुम्ही घेणे. बाकी तिसरी तकसीम यैवज हुजूर स्वारी मजकुरी लावणे. पेस्तर अमल बस-

सुरतप्रातीचे परगणे व तापीपार परगणे या परगणेयाचा बाबती व सरदेशमुखीचा अमल मुलुख व जकातीचा हासिलाची निमे बाबती व कमाविशबाब यैसा यैवज वसूल घेणे. दोनी अमलाचा आकार जमा होईल त्यापैकीं सालमजकुरी निमे यैवज तुम्ही जमेती व माहाल मजकूर मिलोन खर्चास घेणे. बाकी निमे यैवज रसदी हुजूर स्वारी मजकुरी पावणे. सालमजकुरी अमल बैसलियावरी पेस्तर साली बाबती व सरदेशमुखीची कुलबाब जमा आकार होईल त्यापैकी तिसरी तकसीम यैवज तुम्ही जमेती व माहल मजकूरच्या खर्चास घेणे. बाकी दोनी

[१] रसद = Money paid into the public treasury by the native collectors as the amount of their collection (Wilson)

ल्रियाउपरी निमे यैवज गड व ठाणी व जमेती व माहाल मजकूरच्या खर्चास तुम्ही घेणे. बाकी निमे यैवज रसंदी हुजूर स्वारी मजकुरी पावणे.

तकसीमा यैवज दोनी तकसीमा रसदी हुजूर स्वारी मजकुरी पावणे

कलम १

कलम १

येणे प्रमाणे दोनी कलमे ह(स)दरहू प्रमाणे तह केला असे. तुम्ही जबरदस्तीनें आमल बैसऊन स्वामिकार्य करणे. सदरहू तहप्रमाणे तुम्ही कबूल करून आपले पत्र लेहोन दिल्हे आहे. तरी सदरहू तह प्रमाणे रसदी यैवज हुजूरस्वारी मजकुरी पावता करणे. छ २ जिल्हेज बहुत काय लिहिणे.

¶*The Peshwa Bajirao assigns to Satvoji Jadhao the revenue administration of the provinces of Jawhar, Ramnagar, North Konkan and Surat. He fixes the percentage of the assessment to be received by Jadhav and that to be paid to the Peshwa. He also asks the addressee to settle the province of Surat and establish the Peshwa's authority in that region.*

---

*No. 2]* *[30-12-1733*

पौ छ ९ साबान

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान

स्वामीचे सेवेसी

पोष्य वासुदेव जोसी कृतानेक नमस्कार विनंती. येथील कुशल ता। पौष्य शुध पंचमी रविवासर जाणून स्वकीये लेखनाज्ञा केली पाहिजे विशेष- स्वामीनी पत्र पाठविले ते पावलें. तेथें आज्ञा केली कीं, राजश्री कृष्णराव महादेव यास जवार रामनगर पेठ वासदे येथील मामला व सात माहालखेरीज जकाती धंदा सांगितला. त्यास तुमचे कारकिर्दीस साल गुदस्तां आकार जाहाला त्याप्रमाणे मारानिलेचे हवाली केला. त्यास सालमजकुरीं तुम्हाकडे वसूल जाहाला असेल तो व सालमजकुरी या मामलियांत कोणी जाजती चढ कबूल केला असेल तो लेहून पाठवणे म्हणून लिहिलें. येसियासी जाजती चढ जाहला त्याची यादी आलाहिदा लेहून पाठविली आहे त्यावरून कलो येईल. सालमजकूरचा वसूल तरी कमाविसदार आणून वसूल जाहला तो हिसेबु लेहून घेऊन मागाहून पाठऊन देतो. कलले पाहिजे हे विनंती.

¶*This paper refers to the appointment of Krishnarao Mahadev as the Mamlatdar of Jawhar, Ramnagar, Peint and Bansda in the place of Vasudev Joshi.*

No. 3] [1736 ?

श्री

श्रीमंत राजश्री आपा
स्वामींचे सेवेसी

सेवक कृष्णराव महादेऊ कृतानेक सां नमस्कार विनंती उपर येथील कुशल जाणून स्वकीय लिहिल पाहिजे. स्वामी किलियास आलियानें किला हातास येतो. नाही तरी हातचे जातो. आमचा पैका खाऊन किला घेऊन जे चढले तेच बलावलेसे जाहले. आपण किल्याखाले येऊन बसलो. आजि तागायत आपण वीस हजार रुपये पावेतों खर्चीखालि आलों. आता ते लवाडी करितात आणि किलियाचा पेगाम आगरियाकडे लाविला असें जाहले असे. याउपर आपण जिवत येतो येसे नाहीं. स्वामी आले तर किला खामखा जोरावरी घेऊन. चिंता न कीजे. हे होत नाहीं तर किला जातो. येथे च्यार दगे वाढले आहेत. आपण आलियानें सर्व उत्तम होईल. बहुत काय लिहिणें हे विनंती. आपण याचा राखोन बसलो आहो. सत्वर आलें पाहिजे हे

¶*Krishnarao Mahadeo begs succour from Chimaji Appa to reoccupy the fort captured by a detachment of men financed by him who now refuse to deliver the place to him.*

---

No. 4] [2-5-1733 ?

पा। छ ४ मोहरम

श्रीशंकर

श्रीमंत राजश्री पंत प्रधान
*स्वामीचे सेवेसी*

सेवक कृष्णराव माहादेव सा। नमस्कार विनंती. येथील कुशल वैशाख वद्य अमवाशा मुकाम का। वाडे प्रा। जवार जाणून स्वकीय कुशल लेखनाज्ञा केली पाहिजे विशेष. स्वामीनी आज्ञापत्र पाठविले ते पावले. कोलवण प्रांतातील रयेत कल्याण भिवंडी प्रांते गेली आहे. त्याजवरी बाकी आहे. त्याचे वसुलाचें तोट लाविले आहे. त्यास मनारोखे द्यावे, तगादा न लागे ते करणे म्हणून आज्ञा केली. आज्ञेवरून मना रोखे पाठविले. उपसर्ग किमपि लागन्हार नाहीं. वरकड आम्हाकडील वर्तमान तरी कोलवण प्राते स्वारी जाली, तेव्हा जवारकराकडून रा। शिवाजी हरि सबनीस का। वाडे येथील मुकामास येऊन बाकीची निल्हे वाइदेबंदी करून तह करून गेले. पुढे रामनगराकडे गुदस्ताची बाकी

व सालमजकूरचा ऐवज राहिला आहे याकरितां उदंक कूच करून रामनगरास जाऊन तेथील पैकियाची विल्हे जाली म्हणजे सेवेसी येऊन. बहुत काये लिहिणे कृपा लोभ असो दिल्हा पाहिजे. पुढे त्या प्रांते जे वर्तमान होईल ते सेवेसी लेहून पाठऊन हे विज्ञापना.

¶*Krishnarao Mahadeo promises to remit the revenue partially to the agriculturists of Kolwan.*

---

*No. 5]* *[Before 1729?*

श्री

राजश्री पंत प्रधान गोसावी यासी

ॐ श्रीमंत सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्नेहांकित पिलाजी जाधव दंडवत विनंती येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लेखनआज्ञा केली पाहिजे. विशेष. पत्र छ १९ रविलोवल जेजुरीचे मुकामाचे पाठविले ते छ २६ माहे मिनहूस कसबे देहरजे प्रा। जवार येथे पावले. तेथे आज्ञा की बेलदार सेंभर व बरकंदाज उदापुरी होते ते व सुपाचे यैसे सें दिडसे पाठवितो. गडचीं बेहबुधी करून लोकाची समाधानें करून राजश्री रामचंद्रपंत व तुम्ही येके विचारे राहून तो प्रांत सोडवणे, गंभीरगड वगैरे स्थले हस्तगत करणे, उदापुरी मुधोजी चकोर ठेविला आहे त्यासहि जे सांगणे ते सांगितले आहे. तिकडील स्थले राजश्री रामचंद्रपंताचे विचारे सोडवणे म्हणून सविस्तर लिहिले. यैसीयास कल्याण प्रांते जवारकरानी चोर रात्रीचे घाळून गाव दोन च्यार सदरेचे जाळिले, यास्तव ते निरोप घेऊन कल्याणास गेले. दाहा पाच माणूस रात्री गावास आग लाऊन जाते त्यास फौजेने काये करावे? जपोन माग काढून वाटा धरून धरावे, हा विचार त्यास आम्ही लिहिला आहे. बेलदार आम्ही पाच सात मेळविले आणि आपण सेंभर बेलदार जेव्हा पाठवितात तेव्हा बालेकिलाचा तट व पाहारे व गल्यास घरे व माचीस वाटा यैसे करऊन किलाची मजबुती करवितो. बेलदाराविण वेइलाज जाला होता, तर अगत्य बेलदार रवाना करावे. आम्ही येथे पाथरवट दाहा माणूस ठेविले आहे व बरकंदाज परदेसी माणूस किलाच्या कामास चाकरीस चोखट आणि विस्वासूक याजकरिता सेंभर दिडसे जे मिलतील त्यास जमान घेवऊन दरमाहा च्यार रुपयेप्रमाणे सिरिस्ता करऊन पाठविले पाहिजे. वरकड स्थलाचा विचार आधी येक घेतला. त्याची बेहबुधी बलकटीने करावी. हे कायेम जालियावरी आणीक उपाये. गला सेंभर खंडी पावतो गडावरी घातला. आणिकहि गला घालीतच आहो. दारू गोली राजश्री

रामचंद्रपंतापासून तिशां रुपयाची घेऊन गडावरी घातली. खंडोजी मानकर व राणोजी रणजोर मिलोन साडेतीनसे माणूस गडावरी ठेविले आहे. परदेसी वरकंदाज जितके येतील ते गडावरी ठेऊन त्याचा ऐवज मन्हाटे खाले उतरऊन जवारकरानी राजश्री अंबोजी देशमुखाकडून मदत आणिली. फरादी वगैरे काही सिबंदी ठेऊन खटपट करिताती. याजकरितां जवार प्रांत तूर्त आठ पंधरा दिवस टाकून आणिका कार्यास जाता येत नाही. येथे बसोन गडचीहि बल्कटी करवितो आणि जवारकर येकदा गाठी घालिते म्हणजे त्यास ठेचका देतो म्हणजे दुसरियाने कोण्हावरी तोंड न टाकीत. आणि तहासहि येतील. रामनगराचीहि सरद च्यार पाच कोस, त्याजवर दवदवा पडला आहे. येका दो रोजा भेटीस येणार. सुरलितपणे चालिले तर बरे, नाही तरी त्यासहि सजा देतो; आणि पंधरा विसा रोजा जाऊन सुरत प्रांतचाहि धंदा मनास आणून येतो. आपण इकडील बंदोबस्ताची चिंता न करावी. तुम्हास सा महिने बोलावीत नाहीं, जड पडले तर लेहून पाठवणे, आम्ही खासा येऊन म्हणून लिहिले, तरी आपण दरबारचा विचार राखोन आमची खबर मात्र घेत जावी. आपणास येणे न लगे. आम्हास सा महिने ठेविले, बोलावीत नाही, तेव्हा इकडील बंदोबस्त आपल्या प्रतापे बराच होईल. दारू गोलीचा सामान पोख्त किल्यावरी आसिला पाहिजे. याजकरिता पूर्वीहि लिहिले आहे. तरी येक खंडी दारू तिकडून अनकूल पडली तरी पाठवावी अगर राजश्री रामचंद्रपतास लेहून देविली पाहिजे. बहुत काय लिहिणे कृपा लोभ असो दिजे हे विनंती.

¶*Pilaji Jadhav writes to the Peshwa, reporting measures adopted by him to reduce Jawhar and Ramnagar.*

---

*No. 6*] [*Recd. 27-7-1736?*

छ २८ रबिलोवल

श्री

पुरवणी श्रीमंत राजश्री पंत प्रधान
स्वामीचे सेवेसी

विनंती. आम्ही पुर्णाया असतां राजश्री मल्हारजी होळकर यांस सांगितले कीं आम्ही कोहोज प्रांते स्वारीस गेल्यामागें चासेस कारमारी होते त्याणी तुमचे लाकडापैकीं च्यार पांच लांकडे खर्च केली. प्रस्तुत लाकडे आहेत ही घेऊन जावी. आम्हाकडे खर्च जाला आहे, तेही उष्णकाल जाला म्हणजे आणून देवितो. तुम्हा आम्हामध्यें लाकडाची मालियत काय आहे? येशा कितेक प्रकार

गोष्टी सांगितल्या व त्याजकडील रो गंगाधर (फाटलें *) णा यांस येकदोन वेळा ये रीतीनें सांगितलें आणि श्रीमंत राजश्री आपाचा निरोप घेऊन आम्ही गांवास आलों. मागें त्यांणी राऊत तयार करून आम्हावर पाठविले त्यांचा हेत कीं कलह करावा. त्याणी राऊत पाठविले ते नावेपर्यंत आले होते. आम्ही तो पुढेंच गेलो होतो. मागून माणसे आलीं त्याणी राउतांचे वर्तमान सांगितलें. आम्हासमागमें पांच खिजमतगार व पालखीचे भोई मात्र होते, त्यांणी तो परिछिन कपटबुध्धीनें राऊत रवाना केले (समजत नाही). ची त्याची वर्तणूक स्वामीच्या चितास येते कीं काय? पुढेंही त्यांची उमेद आहे जे चासेस येऊन गावासी दंगा करावा आनि त्याजपासीं दाहा हजार फौज आहे. चासेस आल्यावरी आम्हास निघोन दुसरें खेडियांत जावें लागेल, गांवांची नास करितील. आम्ही ग्रहस्तपणे त्याजला निवल सांगितलें असतां त्याणी इ(त)का उपद्राप करावा येसे नाही. तथापि हा सर्व अर्थ स्वामीस नकळेसे काय आहे. आम्ही पुणीयास येतेसमई पांचा साता माणसानसीं येतो जातो. मार्गी त्याणी आम्हासी कलह करावा, आम्ही मारले जावे हाच अर्थ उत्तम आसिला तरी रुणानुबंधप्रमाणें स्वामी सर्वज्ञ आहेत. तपसील ल्याहावा येसा अर्थ नाहीं. वरकड त्याचे चितांत खामखा आम्हासीं कटकट करावीच येसे असेल तरी काय चिंता? स्वामीचे (फाटले आहे) समर्थ आहे. स्वामी वडील आहेत, आम्हास शब्द न लागे येसे व्हावें. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विज्ञापना.

¶*Krishnarao Mahadeo writes to the Peshwa a strong complaint against some one for despoiling his village.*

---

*No. 7]* *[1-10-1736?*

श्री

श्रीमंत राजश्री आपा

स्वामीचे सेवेसी

सेवक कृष्णराव माहादेव कृतानेक सा नमस्कार विनंती येथील कुशल जाणून स्वकीये लेखनाज्ञा केली पाहिजे. यानंतर केसो हरि बराबर पत्र आले तेथे पुणियास यावयाची आज्ञा केली, येसियास दसरियास येकदोन दिवस मध्ये राहिले. विजयादसमी जाल्याउपरांतिक स्वार होऊन सेवेसी येतो. वरकड जुनरास (फाटलें * * *) चा मजकूर लिहिला त्यास किल्याचे वर्तमान आम्हास येथे कळोन उपरांतिक गेलो येसा अर्थ नाहीं. जुनरी असतांच वर्तमान कळले. तैसेच तजविजेने मोगलास पुसोन गुरुवारी स्वार होऊन चासेस आलों. तों

मार्गी चासेजवळच स्वामीचे पत्रही पावले. जुनरचा मोगल फार श्रमी जाहला. मुल्याकडे सांड रवाना केली आहे तिचा जाब आल्यावर काय विचार होणे तो होईल. विषम तो फार जाले आहेत. सेवेसी (क)ळावे म्हणून लिहिले असे. बहुत काय लिहिणे हे विज्ञापना.

¶*This is Krishnarao Mahadeo's letter to Chimaji Appa regarding some affair of Junnar.*

---

*No. 8]* *[8-11-1736?*

छ २१ रजब.

श्री

पुरवणी राजश्री पंतप्रधान

स्वामीचे सेवेसी

विनंती उपरी. रामनगरकराची फौज जवार प्रांते आली होती ते फिरोन सर्देस आपले सिवेत गेली. देहरजे याचे मुकामी रामनगरकराचा मुकाम होता तेथे गुरुवारी रात्रौ जवारकरानी छापा घातला, झुंज जाहले. रामनगरेयांही पिटून लाविले. दोन च्यार माणूस याचे, दोन च्यार त्याचे जाया जाले. जवारकराकडील सरदार मानाजी सुर्वे व सखोजी नटवे व गंगाजीराऊ जखमी जाले, याकरितां मोड होऊन जवारीस गेले. हे वर्तमान आजि प्रतिपदा सोमवारी प्रातःकाळीं कोहिजेहून पत्रे आली त्याजवरून लिा असे. बहुत काय लिहिणे, लोभ करीत गेले पाहिजे हे विनंती.

¶*A fight is reported to the Peshwa between Ramnagar and Jawhar.*

---

*No. 9]* *[18-12-1738?*

श्री

श्रीमंत राजश्री आपा

स्वामीचे सो

सेवक विठल विस्वनाथ साा नमस्कार विनंती उपरी येथील कुशल ताा छ १७ रमजानपावेतो सेवकाचे वर्तमान येथास्थित असे. पूर्वी पत्र लिहिलें आहे त्यावरून सविस्तर कळो येईल. साप्रत आज्ञेप्रमाणे राजश्री गोपाळमामा सेवेसी आले आहेत, इकडील सविस्तर वर्तमान सेवेसी निवेदन करितील त्यावरून कळो येईल. इकडील वर्तमान तर जवारकरानी रामनगरची बहुत खराबी केली. हली जाऊन गभीरगड खाली राहिले आहेत. तेथील मामला जवारकराचे पाई

बुडाला या गोष्टीचे पारपत्य करणार स्वामी समर्थ आहेत. व खंडोजी खांडे स्वामींकडे रवाना करितो. ते काही सरजामासाठीं गुतले आहेत लवकरीच येतील. व हिरोजी चौधरी रामनगराहून आलियावर त्यासीहि रवाना करितों. मागे पत्र लिा आहेत त्याचे सविस्तर वृत चितात आणून त्याचे उत्तर पाठविले पाहिजे. तर जव्हारकराचे पारपत्य केल्यावाचून रामनगरचा टका वसूल होत नाहीं. याउपर जे आज्ञा ते प्रमाण हे विनंती.

¶*Vithal Vishvanath reports to Chimaji Appa a conflict between Jawhar and Ramnagar.*

---

*No. 10*] [पौ *4-1-1739*?

पौ छ ४ सवाल.

श्री

पुरवणी श्रीमंत राजश्री आपा
स्वामीचे सेवेसी

विज्ञापना प्राा खलोड व प्राा पवडी इकडील गांवें रामनगरकराकडे फिरंग्याचे आमदानीत गेले होते. त्याजविसीं सेवेसी विज्ञाप्ति लिहिली होती त्याजवरून स्वामींनी रामनगरकरास पत्र व सनद सादर जाली याजवरून रामनगरकराचे पत्र रामनगरकरास दिले. सनदेप्रमाणे अमल बसविला.

अमल हल्ली बसला.

१ अवर्ली बेहेट पाडे १२ पैकी
ठिकाणी लागले.

१ मौजे अवली
१ मजरे चिरावं
१ मजरे रिटवली
१ मजरे कुडोच
१ मजरे मधवहाल
१ मजरे मसाट
१ मजरे सावरवर्णी
१ मजरे सेलवाचे
१ मजरे वधवले

९

सनदेपैकी देह वोस.

१ कोसी बकुवा.
१ चेहल पोढे
१ बारी

३

४ सनदेखेरीज देहे ठिकाणी
लागले.

१ पाटी
१ धगडमाल
१ वेकास
१ वरोल.

४

वैराण

७

३ तीन पाडे ठिकाणी लागत नाही

---

१२

१ साइली.
१ मौजे दादर
१ मौजे वागक्षेप.

---

१२

१ मौजे हातसाल प्रा नेर इकडे लागली.
अमलांत आली.

---

१३

१ मौजे कुरगाव सालापासून अमलांत आले असे.

नवे देह उमगले ४ हली वैराण परंतु याचे गावची सनद आणि च्यार खेरीज आणिखी तीन गावची सनद येकूण सात गावची सनद मोवम पा पाहिजे. तीन गाव उमगावेसे आहेत, याजकरितां सेवेसी लिहिले असे.

सदरहू नवे गांव येथील येवज रामनगरकरी याणी वसूल घेतला आहे तो येवज नेट्रन मागाहून लिहून पाठऊन. त्याजकडे येवज गेला आहे, याजविसी आज्ञा होईल, की तो येवज घेणे तर त्याचे गांव आहेत तेथे येवज मोबदला जेथपर्यंत होईल तेथपर्यंत करून ज्याप्रमाणें स्वामी आज्ञा करितील त्याजप्रमाणे वर्तणूक करून नवे गावचा वसूल भात १०८॥१॥ दाहा खंडी साडे चार पाईली घेतले. नख्त २१५ दोनसे पंधरा रुो घेतले. पुढे वसूल जेथपर्यंत होईल तेथपर्यंत करून हे विज्ञाप्ति.

¶*Chimaji Appa is informed of the Peshwa's authority being established in the villages mentioned in the list. These had been under the Chief of Ramnagar during the Portuguese regime.*

---

*No. 11*] [पौ *5-1-1739*

छ ९ सवाल

## श्रीशंकरचरद

पुरवणी राजश्री पंतप्रधान
स्वामींचे सेवेसी

विनंती उपरी. जवार प्रातीचा अंमल राजश्री पिलाजीराव याजकडे आहे. येशास तेथील मल्ना अडीच हजार रुपये घ्यावे येसा आपणच रा यशवंतराव

पावळचे मुकामी पर्लोकर्डाळ वर्षी दर्शनास आले. तेव्हां तह केला. त्याप्रमाणें साल दरसाल त्याणी उगवर्णा केली, यंदा धामधुमीचे प्रसंगामुळे मुलूक उद्वस जाला. तन्मुळें थोडीबहुत बाकी राहिली, याकरितां राजश्री पिलाजी जाधव फौजेनसी जवार प्रांती आले. त्यास जवारकराकडून राजश्री यशवंतराव आमचे दर्शनास आले. त्याची आमची भेट होऊन त्याणी कितेक स्वामीचे चरणासी येकनिष्टतेच्या गोष्टी सांगितल्या. त्यावरून राजश्री पिलाजी जाधव यास लेहून त्याची आमची भेट होऊन परस्परें त्याचे त्याचे सौरस्य करून बाकीची विल्हे केली; आणि ते निघोन रामनगर प्रांते जाऊन दवण प्रांत फिरगाण हा मुलुक मारिला. सांप्रत त्या प्रांते आहेत त्यास जवारकराही मक्ताप्रमाणे उगवणी केली. परंतु मक्त्याखेरीज कांहीं तगादा लावितात. ऐशियास मक्तीयाची बोली स्वामी सनिधच जाली आहे. करार जाला त्याचे पत्रही स्वामीचे जवारकरापासी आहे आणि सर्वस्व स्वामीचे म्हणवितात. आपणाखेरीज दुसरा अविलंब नाहीं आणि पुरातन संस्थानिक याचे चालवावे हेच विहित आहे. तरी राजश्री पिलाजी जाधवराव यास पत्र पाठवावे कीं पहिला करार अडीचा हजाराचा जाला आहे त्याप्रमाणें पैका घेऊन जाजती उपसर्ग कोण्हेविसी न लावणें. येस युक्तीने लेहून जे गोष्टीने जवारकरास उपसर्ग न लागे ते केले पाहिजे. मुलूक उद्वस आहे आणि त्याचा वोढीचा प्रसंग यास्तव त्याची शरम राहे तो पदार्थ केला पाहिजे. बहुत काय लिहिणे. यांची बाकी नवसे रुपये बाकी राहिली आहे आषाढमासी घेतली पाहिजे म्हणून जाधवास लिहिले पाहिजे. याचा नातवानी प्रसंग आहे व राजश्री यशवंतराऊ यांणीं (फाटलें आहे) प्रकारे विपर्यास वाढला आहे. आपले पदरी पडणार प्रधानकी टाकिलीयास एक पत्र पाठवले पाहिजे. कबिला घेऊन येणार कललें पाहिजे. हे विनंती.

¶*A representation is made to the Peshwa asking his officer to keep his hands off the Jawhar prince, who is unable to meet the Maratha demand owing to general distress in his territory.*

---

*No. 12]* *[6-5-1739?*

छ ८ सफर

श्री

पुरवणी श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे शेवेशी. विज्ञापना तागायत छ ९ सफर सांप्रत किल्ले गंभीर. पत्र आले आहे कीं राजश्री रामदेराणा फत्तेपुरीं आहेत. चेंडपडोल्याचा फडनीस व अबंधचा फडनीस येऊन राजश्री कृष्णशा यैसे एकरूप

जाले आहेत. फत्तेपुरकर राणा याणी आवंधास जावे. जवारकरानीं किल्ले वाघेरा नावं मुलुक उध्द्वस करावा, म्हणजे गंभीरगडाखालील मुलुक उध्द्वस होईल. उभयेतांही जाण्याचे तरतुदीस म्हणून लिहून आले. त्याचा शोध मनास आणितां झाले गवस? जमावसुद्धा कोहजेखाले जाऊन राहिले. त्या चवल्यास जिकडे तिकडे फिरो लागले आहेत. मानजवारकर जवारकर व फत्तेपुरकरास कळले त्याजवरून भग्न जागा सोडोन जाऊन पुढ मुलूक वैरान करणार उध्द्वस जाल्यावरी सारे कोळी एकत्र होऊन करावया चा विचार दिसोन येतो. त्यास सेवा किल्ले गंभीरगड येथील बंदोबस्त करणे तसा केलाच आहे. अथापि फत्तेपुरकर व जवारकर आपली स्थले टाकून गेलेच तरी आपले किल्याखालील बंदोबस्त उत्तम असला पाहिजे. हशमी माणूस व फौज रवाना करावी लागते. यास्तव स्वामींनी कृपाळु होऊन फौजेची रवानगी करावी. येथे हशमी राऊत मनवराकडील वगैरे होते, रवाना केले. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*News about the Gambhirgad and the Koli Chief of Jawhar is communicated to the Peshwa.*

---

*No. 13*] [*May 1739?*

श्री

सेवेसी विनंती. पुढे कुरंग यावी आणि भास्कर सोडवावा हें आमचे वचन घेतले. भास्करगड गेला तेव्हां राज्यच बुडालें. जवारींत जीव नाहीं व घेरा मोपतगड व वलवंतगडही मेटादाखल असते. लटका खर्च कशास पाहिजे? जवारकरात अर्थ नाहीं. स्वमीनी प्रतिपाल याचा केला. राणीनें कन्या म्हणविले आणि भास्करगड द्रव्य घेऊन देऊं केला. नव हजार तीस पावले. परंतु हे राज्यास कलतां न ये यैसें आहे. पुढें राहिले ते यावे लागतात. आम्ही क्रिया परस्पर मान्य केले ते अन्यथा करितां नये. बावाखान कुरंगेचा त्यास राणीनें शंभर रुपये खर्चास पाठविले तिजला रजावंद आहे यैसे ती सांगते. परंतु विस्वास येत नाहीं. राज्यास तो रजावंद नाहीं. राज्यास आम्ही सागितलें कीं वेढा उठविला तरी मोगलास देतों. राणी तो बोलीप्रमाणें वेढा उठवा म्हणजे आम्ही तीस उत्तर देतों कीं लगामी कुरगडी जावे लागली तरी मग हुजूर विनंती लेहोन उठऊन. राणीची आमची पहिली बोली कीं भास्कर देतें कुरग सोडा यैसे आहे. स्वमीचे आज्ञेविना वेढा उठवीत नाहीं व भास्करगडासाठीं बळकवडे याणी पत्र सेवेसी लिहिले. परतु आम्ही विठलपंताचे स्वाधीन केला. पुढे हेच यांस पुरवतील व दुसरें स्थळ त्याचे येथे येणार. बोली आमचे विद्यमानें जाली. ते स्थळ येतच आहे. त्यास तनखाहि होईल हे विज्ञापना.

¶*The affairs of the queen of Jawhar and Bhaskargad are mentioned in this letter by Shankaraji Keshav.*

No. 14] [27-5-1739

श्री

श्रीमंत राजश्री चिमणाजी
पंत आपा स्वमीचे सेवेसी

सेवक कृष्णराव माहादेव सां नमस्कार विनंती येथील कुशल जेष्ट शुद्ध प्रतिपदा मुा का वाडे प्रांत जवार जाणून स्वकीय लेखनाज्ञा केली पाहिजे विशेष. स्वामीची आज्ञा घेऊन घाटाखाले आलियावरी जवारकरास भय प्रदर्शन होऊन को वाडे येथील मुकामास रा जिवाजी हरि सबनीस पाठऊन बाकीची वाइदेबंदी करून तह केला. पुढें रामनगरास गुदस्तार्ची बाकी व साल मजकुरचा मख्ता व जकात हा कालपर्यंत तैसीच आहे. त्याची विल्हे करावयासी तेथपर्यंत गेले म्हणजे तेहि भयप्रदर्शने विल्हे करितील या विचारे जावें. यैशास पेसजी स्वमीनी कल्याणाहून रा विठल सिवदेऊ याजबरोबर राऊत होते त्यास आज्ञा केली. त्याजवर ते राजश्री विठलपंत याजपासी कोहजेस येऊन बैठा रोजमुरा पंधरा दिवस घेऊन कौल रयतेस दिले होते, त्याचीच वस्तभाव चिरगुटपाघरूणें घेतली. याखेरीज राजश्री जिवाजी हरि सबनीस याची सासू का वाडे येथून कोहजेस जात होती तिजला मार्गी लुटलें. रोख रुा ३०० तीनसे व भाडे चिरगुट पाघरूण घेतले. त्याची याद अलाहिदा पाठविली असे त्यावरून विदित होईल. आम्ही वैशाख वद्य अमवाशा का वाडे येथे आलों ते दिवसी राजश्री विठलपंत रा विठल सिवदेऊ यांस रोजमुरा दिला. दुसरे दिवसी जेष्ट शुद्ध प्रतिपदा जवारकरास भयप्रदर्शन व्हावे, याजकारितां कहीस आज्ञा करून दाणे मात्र घेणे म्हणून कही पाठविली. त्याजबरोबर रा विठल सिवदेऊ यांसहि सांगोन पाठविले जे आज कहीचा विचार आहे. रोजमुरा कोणास देत नाहीं. तुम्ही कही करणें. त्याजवरून त्यानीं राऊत पाठविणें ते तों पाठविलेच, परंतु तोंडीमात्र राऊत पाठवीत नाहीं, रोजमुरा देणें, नाहीं तरी उठोन जाऊन. यैशास अवधियास रोजमुरा दिल्हा नाहीं. ऐसे असोन यासच कही करून रोजमुरा धावा कीं काय? अवधियाचे वर्तणुकेप्रा वर्तत नाहीं. रुसवा करून स्वामीकडे आले आहेत. त्याचा आमचा समंध येका दिवसाचा हा अर्थ स्वामीस कलावे. जेष्ट शुद्ध द्वितीयेस जवारकराचा तह जाला ते दिवसी चौ रोजा रोजमुरा अवधीयास दिल्हा, त्याप्रमाणें त्यास देत होतो, तो न घेतां उठोन गेले. सर्व कुचिन विठल सिवदेऊ याचे आहे. कार्याचे समई रुसवा करून गेले, याजकारिता याचें पारपत्य करावयासी स्वामी वडील आहेत. बहुत काये लिहणें कृपा आसो दीजे हे विज्ञापना.

¶*Krishnarao Mahadeo informs that the Jawhar Raja has been coerced to pay the tribute. He also explains the mischief Vithal Shivdeo was playing.*

6816

## श्रीशंकर

पुरवणी श्रीमंत राजश्री
पंतप्रधान स्वामींचे सेवेसी

विनंती उपरी स्वामींनी पिसजी कल्याणाहून राऊत दिल्हे ते रा। विठल सिवदेऊ समागमे राऊत १४० घेऊन आले. येशास आम्ही आजी जेष्ठ शुद्ध प्रतिपद का। वाडे येथील मुकाम करून जवारकराकडे यैवज येणे त्याचा तह केला. पुढे रामनगरास जावें लागेत. यैशास रा। विठल सिवदेऊ याजबराबरील राउतास रोजमुरीयाचा अर्थ ढमढरे, धायभोर, आपा माणकेस्वर वगैरे पथके आम्हासमागमे देली त्यास रोजमुरा देतो. त्याप्रमाणें विठल सिवदेऊ याजला स्वामीनी नेमणूक करून दिल्ही आहे त्याप्रमाणें देतो. परंतु त्याचे मनास येत नाहीं. जे दिवसी कही जाते ते दिवसी अवघियास रोजमुरा देत नाहीं, त्याप्रमाणे यास देत नाहीं. आणि विठल सिवदेव याजकडील राऊतास यावा कीं काय? त्यास लूट जाली तर रा मागतात. याजकरिता रुसवा करून सेवेसी आले आहेत. आम्हास तो रामनगरास जाऊन त्याजकडील बाकी उगविली पाहिजे. स्वामींनी बराबर राऊत दिल्हे याची याद व रोजमुऱ्याची याद पाठविली आहे त्याजवरून विदित होईल. विठल सिवदेऊ राजश्री विठलपंत याजपासी आगोधर पंधरा दिवस येऊ(न) बैठा रोजमुरा घेतला आणि ज्या गावास कौल हेते त्या गावी कितेक उपद्रव केला. वस्तभाव रयतीचें व चिरगुटपावरून नेलें. यावेगले राजश्री जिवाजी प्रभु सबनीस याची सासू का। वाडे येथून कोहजेस जात असता तिजला लुटलें. त्याचा वस्तभाव व रोख रु॥ ३०० घेतले. त्याची याद अलाहिदा पाठविली असे. याजवरून विदित होईल. कोहज परगणियाचे बैल घेऊन गेले. सर्व कुचोद विठल सिवदेऊ याचे. राउतास फिताऊन नेले. याजउपरी विठल सिवदेऊ याचें पारपत्य करीत नाहीं, तरी आम्ही स्वामीची सेवा करीत नाहीं. कोहज किला व मामला स्वामींनी आटोपिला पाहिजे. आम्हांजवळ जे सामान राहिले आहे ते घेऊन जाऊन जे होईल ते सेवेसी लिहून पाठऊन हे विनंती.

¶*Krishnarao Mahadeo makes a complaint to the Peshwa against Vithal Shivdeo and his detachment accompanying the writer to Ramnagar. Vithal Shivdeo, he says, demands payment for his contingent even when it was sent out on foraging expeditions.*

No. 16] [28-6-1739 ?

छ ८ रबिलाखर

श्री

श्रीमंत राजश्री आपा
स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक शंकराजी केशव साष्टांग नमस्कार विज्ञापना ताा छ २ रविलाखर मुकाम बाहादूरपुरा स्वामीचे पुण्यप्रतापे सेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष. कोहज मामला राजश्री पंताजीपंत यास आहे. त्यास सालमारी कोणी ग्रहस्त जाजती कबुलात करून मामला स्वामी सांगतात म्हणून आइकिलें, येसीयासी पंताजी मोरेश्वर हे ग्रहस्त भले आहित आणि स्वामिकार्याचे सेवक येकनिष्ट इतबारी आहेत आणि त्यांणी आजि दोन तीन वर्षे मामलाही चांगला राखोन कस्त मेहनतही चांगलीच केली आहे व असरीच्या वेढ्यासही मेहनत बरी केली, स्वामीसही विदित आहे. येसियासी त्यांचा मामला स्वामीनी काढून दुसरियास सांगावा असे नाहीं आणि याप्रमाणें दुसरा विश्वासे वर्तेल ऐसे नाहीं. मारनिलेचा मामला काढावा हे गोष्ट स्वामीनी न करावी. दुसरा मामलेदार येईल त्यास मशारनिलेप्रमाणें पोटाग(स) लागोन जहाज फरमास व स्वामिकार्याची तिडीक लागणार नाहीं. यामुळें आमचे साहित्य होणार नाहीं. स्वामिकार्यास अंतर पडेल. स्वामीपावेतो बोभाट येईल याकरितां सेवेसी लिहिले असे. त्याचे हाथे रामनगरकर हाथी धरून घेणे. प्रांतीचे कोळी व येक वनसाञ्याचे राजकारण आणिले आहे त्याजकडून राजश्री गोपाल माहादेव जमावनसी भवानीगडास रात्र दिवस काम करितात. टाटून चालल्या कामास अंतर पडेसे न करावें. मारनिलेचा मामला त्याचा त्याजकडे ठेवणार स्वामी धणी आहेत. टकमकीखाली पचवीस गाव मनोरचे आहेत, त्याजवरी आमची सर्वस्व वेठ बेगार चालते. येक आटगाव तर्फे पाठीमागची गेली, हेही गांव इजारा करणार, तेव्हां आम्हांस कशास (फाटलें * *) ठेविले. स्वामीनी टकमकीचे गांव आमचे आम्हाकडेस असो धावे दुसरियास न धावे हे विज्ञापना.

¶*Shankaraji Keshav reports to Chimaji Appa his views about the settlement of the northern districts and of the troubles caused therein by the Kolis.*

No. 17] [14-8-1739

छ १९ जालोवल.

श्री

श्रीमंत राजश्री चिमणाजीपंत
आपा स्वामीचे सेवेसी

सेवक कृष्णराव माहादेव सां नमस्कार विनंती येथील कुषल जाणून स्वकीये लेखन केले पाहिजे. यानंतर रामनगरकरानी आम्हांसी दंगा करून अमलास खलेल केले. तिळतुल्य अमल चालेनासारिखा जाला. याकरितां सेवगा किला रामनगरकराचा आम्ही घेतला. येसीयास किल्याखाली त्याचा वेढा येऊन बैसला आहे. निमित्य किल्याचे कुमकेबदल. खासा आम्ही स्वार होऊन गेलो. स्वामीस कलावे याकरितां लिहिलें असे. बहुत काये लिहिणे लोभ असो दिल्हा पाहिजे. त्याणी दाटी केली तरी कुमक उपराला करावयास स्वामी समर्थ आहेत. हे विनंती.

¶*Krishnarao Mahadeo informs Chimaji Appa that he had to proceed in person against the prince of Ramnagar for establishing his authority*

---

No. 18] [1739?

श्री

राजश्री रघुनाथजी प्रभु
गोसावी यासी

॥ अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य स्नेो विक्रम पतंगराऊ राजे जवार विनंती विशेष. येथील कुषल जाणोन स्वकुषल सर्वदां लेखन करणे. यानंतर श्रीमंत राजश्री आपाचे सेवेसी रा नानाजीपंत मजकूर पाठविले आहेत. गोसावीहि प्रसंगी आहेत. आपलेविसी साह्यता सर्वथे करतील्च. विशेष लिहिणे नलगे. कृपाद्रिधि करीत जाणे हे विनंती.

¶*Vikram Patangrao, the Raja of Jawhar, writes to Reghurathji Prabhu, the minister of the Angrias, that one Nanajipant has been sent to meet Chimaji Appa.*

---

No. 19] [1739?

श्री

राजश्री चिनामणाजीपंत आपा
गोसावी यांसी

व आपले दयेनें परिसोन स्वकीये कुशल सर्वदा लिहीत गेले पाहिजे. विशेष बहुत दिनावधि कर्मोन गेली. प्रेशणपत्रीं सांभाल केला नाहीं. तरी आपणास गोसावीयांनीं परकीये येसे मनाचेठाईं विचारिलें न पाहिजे. सदेव पदरीचे जाणोन गौर करीत गेले पाहिजे. यानंतर राजश्री शंकराजी केशव यांजजवळ वसईस रा। क्रियाराम प्रधान व रा। वासुदेवजी प्रभु पाठविले होते. त्यास तेथें करार जाला कीं रा। सटवाजी जाधवराव त्यांजवल रा। रायाजी शंकर प्रभु पाठवीत आहो म्हणोन तुमची फौज यांजवल पाठविणे. हे वर्तमान प्रधान माईले आपणाजवळ आलियावरी विदित होतांच राजश्री सटवाजी जाधवराव व राजश्री रायाजी शंकर आनपे (?) राजश्री भायजी प्रभु व रा। वासुदेवजी रवाना केले. गोसावी यांसी कलावें. वरचील प्रांत मजकूर फौजेचे अमदरफ्तमुळे खराव जाला. प्रत्यहीं लस्करचे लोक मुलकांत कही करावयास येतात म्हणोन लस्करचे सरदार यांसी ताकीदपत्र पाठविलें पाहिजे, की मुलकास कोण्हे गोष्टींनें उपद्रव न देत. आपण सर्वस्वें गोसावी यांचे पदरीचे आहों. वडीलपणें गौर करीत गेले पाहिजे. कृपालोभ असो देणें हे विनंती.

*¶Ramdeo Rana of Ramnagar informs Chimaji Appa that he sent his contingents to fight under Shankaraji Keshav and requests the addressee to preserve his district from further molestation at the hands of Maratha soldiers marching towards Bassein.*

---

*No. 20]* *[1739 ?*

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान
स्वामीचे सेवेसी

पोष्य कृष्णराऊ माहादेऊ सां। नमस्कार विनंती येथील कुशल जाणून स्वकीय कुशललेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष आपण पत्र पाठविले तेथें आज्ञा कीं लोकांस रुपये देविले आहेत ते आधी पावणे व पनाल्याचे मसलतीचे लोक लौकर पाठवणे. येशास पैकीयाची बोली आपणाजवळ करून आली, त्यावर वरातदार जे आले त्याचे पदरीं येवज घालून कबजे घेतली आहेत. कोण्हाचा पैसा राहिला आहे येसे नाहीं. लोकाचेविसी लिा त्यासही पुण्यास येताच चहूकडे माणसें पाठविली आहेत, परंतु सांप्रत या मुलकांत ज्वराचा उपद्रव बहुतच जाला आहे. घरोघर कोण्ही मनुष्य पाणी घावयास नाहीं. राजश्री सखोजी सिंदे यास तो व्यथा भारीच जाली आहे. याचा देखील बंद जाली आहे. आयुशाची मर्यादा काय असेल ते नकले. कितेक मृत्यहि पावले. लोहगडी पाचसात मनुष्यें मेलीं.

येसा प्रल्य जाला आहे. कोकणात तो या दिवसांत वर्शास व्यथा लोकास थोडथोडी होतच असते. त्यामध्यें हा संचार जाला यामुळें तो बहुतच श्रमी लोक जाले. सेतेभाते जनावरे खातात. भूमिवर पडोन जाया होतात त्यास आटोपायास कोण्ही नाहीं. आमचे घरी मुले लेकरे आदिकरून व्यथस्त पडिली आहेत. कल्याणी मातुश्रीबाईस बरे वाटत नाहीं. जानकीबाई रामचंद्रपंताची स्त्रीस तो अत्यावस्त वेथा. दशमीस प्रात:कालीं भुईवर उतरली, येसे पत्र आले. बाईसहि व्यथा, यास्तव सर्व काम टाकून आजी द्वादशीस प्रात:कालीं स्वार होऊन कल्याणास गेलों. पुढे श्री काय करील ते पाहावें. लोकाकडे माणसे पाठविली आहेत. सुस्ती केली येसे नाहीं. परंतु दुखण्यामुळे दिसगत लागेल यास्तव लिहा आहे. जो जमाव तयार होईल तो बरोबर पाठऊन देतो. आणि श्रीने जानकीस कल्याणरूप रक्षिल्या आम्हीही लौकरीच लोहगडी येऊन. बहुत काय लिहिणे. येथे पनासा माणसाचा सरदार सकरोजी जाधव आला तो च्यार घटकांत जर येऊन मेला. कोणी माणूस बाहीर पडत नाहीं. सकाजी मईटी येक दोन दिवसाचे सोबती आहेत. आपल्यास आज तीन दिवस जर फार येतो. बाईस व जानकीस वेथा फार भारी, यास्तव आपण टाकोटाक अजि द्वादसीस प्रात:काली कल्याणास गेलो. नेमणुकप्रमाणे येवज लोकांस पावता केला. काहीं बाकी राहिली नाहीं आणि त्वकरीच फिरोन येतो. आपलियास तिकडे वीस दिवस लागतील इतकियात होईल ते नकले. वरकड इकडील अवस्ता पत्र त्याहात्री सारीखे नाहीं. पिपरखेडचे ताकीदपत्र चिमणाजी परशरामाचे लेकास पाहिजे. त्या गावाकड पाहावयास दरकार नाहीं येसे आगत्य पाहिजे. हे विनंती.

¶*Krishnarao Mahadev reports to the Peshwa from Kalyan an outbreak of a virulent fever of which many were dying fast.*

---

*No. 21]* *[1739 May?*

श्री

सेवेसी विनंति राजश्री बचाजी रघुनाथ याजबरोबर दोनसे माणूस व गणपा उतेकर माधवराव खोपकर अंताजी मल्हार व गंगाजी हरि पराव दिमत येसाजी हरपला हे होते. त्यास गंभीरगडचे तटास मातहात सिडी गटगा कोरा होता तेथे लाविली. सिडीखाली सदरहू सरदार व धारकरी लोक होते. त्यास हव्या सिडीवर चढोन गेला. तो हव्याचेच धक्यानें दगड लवंडला. तेणेकरून व वरचे लोक धावोन सारा गडगाच लोकावरी लोटीला, त्यामुळें माधवराव खोपकर व गण-

पाटील व गंगाजी हरि पराव अंताजी मल्हार हे मातब्बर पुढे होते ते पंचवीस तीस या वर्ती दगडीखाली मेले. वरकड तीस चालीस दगडीचे जखमी वरकड शाबूद येत आहेत अद्याप पुरता शोध नाहीं, परंतु चौवे सरदार दगडानें मेले. येैसे हेच स्वारीतून लोक आले त्याणी सांगितले. शोधास माणसे पाठविली असेत. व रामनगरा कोलीयानें पा वन्हे येथील एक गांव लुटून नेला त्यास रामनगरकरास लिहिले कीं सावकाराचे कासीद मारिले, पैका नेला म्हणून हे कर्तव्य प्राप्त जाले. त्यास पुढें रामनगरकरास ठेचगा दावयाचे असले तरी तसीच आज्ञा करावी. स्वारहि आलेच आहेत. त्याचे पारपत्य करून कांहीं परगणे घ्यावे हा विचार पौप सरलियावर मग करावा याची आज्ञा करावी. आग्रह करून बचाजीनें लोक नेले. आम्ही न यावे तरी खावंदास सांगोन म्हणत होते. आमचे विचारे * * जाले फिरोन वरचेवरी न करावेसेच होते. सेवेसी विज्ञापना पथकाची रवानगी जाली.

*¶The disaster that occurred at the time of scaling the walls of Gambhirgad and to which a number of people fell victims is described in the letter. An incident between the Kolis and the chief of Ramnagar is mentioned.*

---

*No. 22]* *[1739?*

श्री

राजश्री चिमाजीपंत आपा गोसावी यांसी श्रीसकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्नेहांकित पिलाजी जाधवराऊ दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकुशल लेखनाज्ञा केली पाहिजे विशेष. रामनगरकरानी आम्हास पत्र पाठविले, तेथे लिहिले कीं आपले मुलकी वर्तमान कितेक राजश्री पंतप्रधान यापासी निवेदन करावे लागते, तरी येविसी त्याचे पत्र आले म्हणिजे भला माणूस पाठऊन सविस्तर वर्तमान विदित करून. येविसी आपणासहि पत्र लिहिले आहे, तरी त्यास उत्तर लेहून दिल्हे पाहिजे. भला माणूस येऊन वर्तमान विदित करून जाईल. आम्हास पत्र लिहिले. होतें त्यास उत्तर आम्ही लेहून दिल्हे. विशेष कार्य लिहिणें कृपालोभ असो दीजे हे विनंति.

*¶Piloji Jadhav intimates to Chimaji the intention of the Ramnagar prince of sending an envoy to the Peshwa to acquaint him with his situation.*

6852

No 23] [27-3 1740

श्री

श्रीमत राजश्री आपा
स्वामींचे सेवेसी

सेवक कृष्णराव माहादेव सा। नमस्कार विनती येथील कुशल चईत्र शुद्ध यकादसी गुरुवार येथास्तित जाणून स्वकीय लेखन करावयासी आज्ञा केली पाहिजे विशेष. येथे आमचे जागीरीचा मोबदला होत नाही यास्तव जागीरी ठेविली तरी स्वामींनी आमची जागीर न घ्यावी आणि तिकडे कोणी माणूस न पाठवावे. आमचे अमलात खलेल न होय ते गाष्ट करावी इतके असोन स्वामी चालीवर दृष्ट देऊन जागीर घेतील तर आपण इकडील इकडे जाऊन. यमें समजान यास साफ उत्तर द्यावे की आपण हे जागीर घेत नाही, याचा येवज दुसर माहाल देणे, यम पष्ट लेहून पाठविने. स्वामी जागीर घेतील तर आपण इकडील इकडे वाराणसीस जाईन, मग स्वामीवर निमित्य येईल. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे. वडीलपणास उचित ते कीजे हे विनती.

*[Krishnarao Mahadev protests to Chimaji Appa against his Jagir being confiscated*

---

No 24] . [16-8-1740

श्री

यादी राजश्री वालाजी पडित प्रधान याचे तीर्थरूप बाजीराव पडित प्रधान यास पगजी इनाम होता, त्यास ते मृत्य पावले त्याचे पुत्र पंडित मजारनिले याम इनाम व वतने करार करून दिल्हे. छ ४ जमादिलाखर सन इहिद अर्बैन रौद्रनाम सवछर.

१. मौजे कठापूर संमत कोरेगांव
प्रांत वाई स्वराज्य व मोगलाई येकूण
दुतर्फा देखील इनाम तिजाई सरदेश-
मुखी व सावोत्रा कुलबाव कुलकानू

येकूण पांच गांव व येक परगणा इनाम व दोन माहालचे सरदेशामुखीचे वतन दफ्तर रुजू असे.

¶*A list of inams transferred to Balaji Bajirao after the death of his father Bajirao, is given in this paper.*

---

No. 25] [December 1740

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी. सेवक कासीराऊ सिवदेव सा नमस्कार विनति उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुपल लेखन करीत गेले पाहिजे. विशेष. राजश्री चिमाजी अपा यांसी देवाज्ञा जाली म्हणून वर्तमान यैकिलें त्यावरून चितास परमखेद जाला तो लिहितां पुरवत नाहीं. फार वाईट जालें. स्वामीस तो अतिशयेंसी दुःखाच्या रासी जाल्या, परंतु हे गोष्टीस उपाय नाहीं. ईस्वरी सत्ता प्रमाण. स्वामी सुज्ञ आहेत. खेद न करावा. विवेक करून खेद परिमार्जन केला पाहिजे. विशेष काय लिहिणे. कृपा असो दिल्ही पाहिजे. हे विनती.

¶*Kashirao Shivdev, in a wholly autograph letter, offers Peshwa Nanasaheb condolences on the death of Chimaji Appa.*

---

No. 26] [1740 ?

तेरीज[१] जमा वसूल बाकी साल मजकूर
माहाये हिंदुस्तान प्रांत माल्वा स्वागी

१/११

| | |
|---|---|
| राजश्री पंत प्रधान मुा आर्वेन | अज रुपये |
| निा मल्हारजी होळकर वगैरे | २०१००७॥।≡ |
| प्रगणे सिरोज वगैरे | २६६४५९॥।≡।॥ |
| प्रगणे भूपाळ | २२५५०० |
| प्रगणे खेर्चीवाडा | ६९८५३ |

१ तेरीज=An abstract account completed from other detailed accounts (Wilson).

6854

| | |
|---|---|
| प्रगणे कोलाबाग वगैरे | ३७४४७॥≡। |
| सरकार शाहाबाद | ११८८१९८= |
| प्रगणे भोवेरासे वगैरे | ९३०७३।≡। |
| प्रगणे उदेपूर सरकारचे | १२४००८–॥ |
| प्रगणे महतपूर सरकार | ५३०१८–॥ |
| प्रगणे नेमलासे | ९७२६॥. |
| प्रगणे डागीवाडा | ३७०२॥. |
| प्रगणे खुदाबाद सरकार | १५७९३॥–॥ |
| माल तर्पे मुनैरा सरकार | १५५१॥–॥ |
| प्रगणे गुन्हा तालुका | १४६०॥॰ |
| प्रगणे बुदी | ४९५०० |
| | १००४९९७॥≡॥ |

| येन नख्त रुपय | घाडी रास | गा किमत |
|---|---|---|
| २०१००७॥≡ | ० | ० |
| २६६४९९॥≡॥ | ० | ० |
| २२५५०० | ० | ० |
| ६९८५३ | ० | ० |
| ३७४४७ | ० | ० |
| ११८१९८= | ० | ० |
| ९३०७३।≡। | ० | ० |
| १२४००८–॥ | ० | ० |
| ५३०१८–॥ | ० | ० |
| ९७२६॥. | ० | ० |
| ३७०२॥. | ० | ० |
| १५७९३॥–॥ | ० | ० |
| १५५१॥॰॥ | ० | ० |
| १९६०॥॰ | २ | ५०० |
| ४९५०० | ० | ० |
| १००४०९७॥≡॥ | २ | ५०० |

¶*This is an abstract of receipts from Malwa*

No 27] [18-3-1741 ?

पौ. छ १६ मोहरम

श्री .

श्रीमंत राजश्री नाना

स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक रामाजी माहादेव चरणावरी मस्तक ठेऊन सा नमस्कार विनंती विज्ञापना ता छ १२ मोहरमपावेतो ठाणे मजकूरचे व लोकाचे वर्तमान यथास्थित आसे विज्ञापना. छ ११ मोहरमी प्रहरे रात्रीस उरुनाहून कागद साबाजी तुकाजी याचा आला की, राजश्री संभाजी आंगरे अकसीच्या (बदरी) येऊन दाखल जाले म्हणोन रा मानाजी आंगरे यानी त्यासी लेहून पा की तुम्ही पत्र दरशनी येणे. त्यावरून मारनिलेनी पत्र पाठविले तेथ लिहिल की, या प्रकारचा प्रसग आहे. श्रीमंत राजश्री आपा स्वामी प्रसगी नाही तरी तुम्ही कुमक करावी म्हणोन त्यानी लिा. त्यासी स्वामीस रा मानाजी आंगर याने लिा आसे. त्यासी सारे फिरगानचे नाक हुरून हा जागा त्याचे हस्तगत जाला म्हणजे कार्य चव नाही. त्यासी त्यानी लिा यैसे आसो(न) उपराला न करावा हे गो उतमात नसे. याजकरिता संभर माणूस निशान करणवा रा कानोजी राजे देऊन पुढे हुरुणास रवाना केले. त्यासी हे जाऊन दाखल जाहाले म्हणजे आणिखीहि लोक मागाहून पाठवितो. या समयांत कोणी येक गो जाहाली तरी जाहली. त्यासी राजश्री शंकराजीपतासहि लिहिले आहे की श्रीमंत राजश्री आपा स्वामीचीहि आज्ञा तुम्हास जी होती तिचा हा प्रसग आहे. तरी तुमचे जे अरमार आसेल तितके घेऊन तथील बदोबस्त करून तुम्ही येणे. जाजा व जमाव पा यैसे त्यासीहि पत्र देऊन कारकून पा आसे. यैसेच राजश्री नारायेण जोसी यासीहि लिहिले आसे. * * * . * * आहे. त्यासीहि कलवीयासी बलाविले आसे. तेहि येतील तरी स्वामीजवल जे लोक आसतील त्यासी पत्र (पा)वताच रवाना करावे. येथे भरणा थोडका आहे. लोकास ताकीद स्वरूप करावी की, दाहे दिवसी जाऊन पोहचावे, यैसी आज्ञा करावी म्हणजे येऊन पोहचतील. हा समय येणार नाही. वरकड सविस्तर वर्तमान वासुदेव गोविंद सेवेसी निवेदन करितील. सेवसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Ramaji Mahadeo communicates to the Peshwa the contents of a letter addressed by Manaji Angria to Sabaji Tukaji asking him to send him succour for the capture of Uran. He has accordingly—he says—sent some succour to him with a view to prevent Sambhaji Angria occupying it. The place, adds the writer has much strategic importance, and as such must not be lost.*

No. 28] [19-6-1743

नकल.

## श्रीशंकर

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ७० रुधिरोद्गारी नाम संवत्सरे आषाढ शुध दशमी इंदुवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी याणी समस्त राजकार्यधुरंधर विस्वासनिधि राजमान्य राजश्री बाबूराव सदाशिव यासी आज्ञा केली येसीजे. कर्नाटक प्रांत विज्यापूर प्रान्त भागानगर अहद तुंगभद्रा दक्षणतीर तहद रामेम्वर हरदु सुम्याचा तालुका हुजूर खासगीकडे आहे तेथील चौथाई व सरदेशमुखीचा अमल तुमचे स्वाधीन करून पांच साले साल दरसाल रुपये ७०००००० सात लक्ष प्रमाणे मुकरर केले आहेत. सन इसने व सन सलास दोन सालाचे रुपये १४०००००० चौदा लक्ष व बाबत हवाला चंदावर रुपये ५०००००० पांच लक्ष येकून रुपये गा १९०००००० येकुणीस लक्ष पेशर्जाचे या मामल्याचे माथां आहेत ते तुम्हीं मान्य केले. यास्तव तह करून दिल्हा तितपसील:—

· पूर्वील बेरीज

७०००००० सन इसने

७०००००० सन सलास

५०००००० बा। हवाला चंदावर

१९००००००

येकोणीस लक्षांपैकी वसूल तुम्हीं साल मजकूर सन आर्बा आर्बेनात दिल्हा रुपये

१५००००० नख्त छ ७ जमादिलावल मा। देवराव मेघशाम.

५००० तुम्हास बहुमान मोत्याचा तुरा दिल्हा त्याचे ठेविले रुपये

११४६५०० हवाला खोली दमाजी गायेकवाड याचे भाऊ जयसिंग व केदारजी गायेकवाड

१३०१५००

एकोणीस लक्षपैकी बाकी राहिले रुपये ५९८५०० पांच लक्ष साडे अठ्याणव हजार, त्यापैकीं चंदावरकराकडील वरातानी व रोख वसूल जाला आसेल तो सदरहू बेरजेत वजा पडतील. बाकी राहिला येवज रुपये

सन अर्बा अर्बेनापासून तुम्हास मामला सांगितला. पूर्वील रुपये दोन सालाचे तुम्हीं मान्य करून वसूल दिल्हा. यास्तव साल मजकुरापासून पुढील सालाचा येवज चडते सालानी वसूल घ्यावासा तह केला आहे त्या प्रो। साल दरसाल देत जाणे कलम १

तेरा लक्ष दीड हजार. बाकी रुपये
५९८५०० पाच लक्ष अठ्यानव हजार
यो कलम १

येणेप्रा पूर्वील रुपयाचा व पुढे साल दरसाल हुजूरचा यैवज पावता करावयाचा तह करून दिल्हा आहे. तहाप्रा यैवज पावऊन मामल्याची बंदोबस्ती करून अमल करणे. स्वामीस सर्व प्रकारे तुमचा अभिमान आहे. घालमेल होणार नाही येविषी आपले समाधान असो देणे. छ ७ जमादिलावल सन आर्बा आर्बैन. खास दस्तक. मामला कर्नाटक प्रांतचा तुमचे स्वाधीन केला आहे तर तहनामाप्रा बंदोबस्त करून हुजूरचा यैवज हुजूर तहाप्रा पोहचावणे. सेवा करून स्वामी संतोसी होई ते करणे. मामला करणे. बहुत काये लिहिणे ? सुज्ञ असा.

¶*King Shahu assigns the Mamlat of the Karnatak to Babuji Naik and fixes annual payments to be made to Government. The paper mentions that Karnatak was one of the King's personal estates.*

---

*No. 29*] [*27-11-1744*

नकल

**श्री**

स्वस्ति श्री राज्याभिषेक शके ७१ रक्ताक्षिनाम संवत्सरे माघ शुध्द पंचमी मंदवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी याणी समस्तराजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री भगवंतराव पंडित आमात्य हुकमतपन्हा यासी आज्ञा केली येशी जे. चिरंजीव राजश्री रामराजे बावडियास तुम्हाजवळ आहेत म्हणोन तीर्थस्वरूप माहाराज मातुश्री काकीसाहेबानी स्वामीजवळ सांगितले. त्याजवरून आम्ही राजश्री भगवंतराऊ नरहरि दफ्तरदार दिमत मजमू यास पाठविले. त्याणी तुमची भेट घेऊन चिरंजिवास पाहून आले. सकळ अर्थ कळविला व त्यांस तुमचे बोलणे होऊन राजश्री सिवराम पंडित यास गुप्तरूप येथे तुम्ही पाठविले, त्यांस तीर्थस्वरूप मातुश्री साहेबांचे विद्यमाने राजश्री गोविंद खंडेराव चिटणिवीस याणी भेटऊन दोन तीन वेळा त्यासी बोलणे ठरले, त्याप्रमाणे तुम्ही चिरंजिवास पानगावी पाठऊन द्यावे. तिकडहि सूचनेस भगवंतराऊ यास पाठविले जातील. येथून तुम्हाकडे सिवराम पंडित यांसमागमे गोविंदरायास पाठवावे असे ठरले आहे. त्यास मागाहून गुप्तरूपे पाठविले जातील. भगवंतराऊ दफ्तरदार यास पानगावीहून नेहमी इकड व तुम्हाकड येण्याजाण्यास आज्ञा केली आहे. सिवराम पंडित याणी स्वामीसंनिध विनंती केली की आमचा जिल्हा व

जातीचा सरंजाम व वतन व इनाम गाव व कुल यखत्यार लिहिण्याचा दरख पूर्वी चालत आल्याप्रमाणे चालविले जाईल याप्रमाणे स्वामींचे वचन जाले; परंतु आमचा जिल्हा प्रतिनिधीस स्वामींनी दिल्हा व प्रधानपंताकडे मोठे मोठे गाव गुंतले व दरखाचे लिहिणे ठाईठाई होते. माहादाजी गदाधर यास स्वामींनी मजमू सांगितली आहे. त्याणी दरख राखिला नाही. आम्ही पेशजी आलो ते समई स्वामींनी मजमू व छदोग आमात्यपद आम्हास देऊन ठेविले. इतकियात श्रीमंत राजश्री बाबासाहेबी येऊन स्वामींस विनंती केली, तेव्हा स्वामींनी त्याजपासून शेफत घेऊन त्याचे स्वाधीन केले. त्याप्रमाणे याणी पुन्हा आम्हास इकडे येऊ दिल्हे नाही; आसे पुढे जाले तरी आमचा सेवक लोकाचा परिणाम काये? त्याजवरून मातुश्री साहेबाचे पायावरी हात ठेऊन, श्रीबालकृष्णाजीच्या व श्री अंबाबाईची फुले तुलसी सिवराम पंडित याचे हाती दिल्ही, ती तुम्ही घेणे; व त्याचीहि शफत स्वामींनी घेतली आहे. व सिवरामपंताची स्त्री सौभागिवती दुर्गाबाई याणी रामराजे यास फारफार जपून सौरक्षण केले म्हणोन कळले, त्यास दुर्गाबाईस साडीचोळीबदल देशमुखीचे वतन स्वामींचे आहे ते तिजला इनाम करून देऊन चालविले जाईल. माहादाजी गदाधर याणी दरखाची उजरिसी राखिली नाही, याजमुळे पायमल्ली आहे तसे पुढे होणार नाही. स्वामींनी शफतपूर्वक मशारनिलेजवळ वचन दिल्हे आहे. तुम्ही कोण्हेविसी संशय न धरणे. तुमचे ऊर्जित स्वामी करितील. जाणीजे छ ३ जिल्काद सुाा खमस आर्बैन मया व अलफ मोर्तब असे.

¶*This important letter addressed by King Shahu to Bhagwantrao Amatya reveals an important fact that Ramraja who was under the kind protection of Shivarampant Amatya at Bawada, was removed to Pangaon by the orders of Shahu, which he issued in consultation with Tarabai and his principal officers. Shivaram Pandit and his wife Durgabai who nursed Ramraja in his childhood were, the paper mentions, rewarded with Inams and other gifts for their valuable services.*

---

No. 30] [1746?

श्री

बालके जयाजी सिंदे साष्टांग दंडवत विनंती उपरी. येथील वर्तमान ता मल्हारजीबावानी लिहिले आहे त्याजवरून विदित होईल. जुंज जाले ते समई गोविंदराऊ सिंदे यांची घोडी व सेटिबा भोईटा जर्दाद याचा घोडा व आमृतराऊ याजकडील घोडी यैसी पडली. पागेचे दोन घोडे पडले. दोन जग्यमी

जाहालें. मालोजी भोंसले यांजकडील सयाजी पवार झुंझात कामास आले. आणखीहि लस्करांत घोडी दोन च्यार जखमी जाहाली. बेलदार व कामाठे पाठऊन यावे. दाहावीस माणूसहि जखमी जाले. हे विनंती..

¶*Jayaji Sindia reports a fight and mentions the losses. This may possibly refer to the siege of Jaitpur. (See No. 39.)*

*No. 31*] [*15-12-1745*

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री
अंताजी नारायेण स्वामी गोसावी यांसी

पोष्य बाळाजी बाजीराऊ प्रधान नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीयें लिहीत जाणे विशेष. राजश्री त्रिंबकराऊ विस्वनाथ यांचे पुत्राचे लग्न आहे यास्तव जामदारखानापैकी बादली अगर पैठणी सनगे जरुरीस जी लागतील ती देविली असेत. देणे आणि मारनिलेचे नावे खर्च लिहिणे. जाणिजे रा छ २ जिल्हेज सुाा सीत आर्बैन मया व अलफ. बहुत काये लिहिणे हे विनंती.

¶*Peshwa Balajirao asks Antaji Narayan Phadnis to lend some valuable clothes from the Peshwa's stores to Trimbak Vishvanath Pethe who was performing the marriage of his son.*

*No. 32*] [*23-12-1745 ?*

छ २३ जिल्हेज

श्री

पुरवणी श्रीमंत राजश्री पंत
प्रधान स्वामीचे सेवेसी

कृतानेक विज्ञापना. बिदनूरकराकडील वकील राजश्री नारोपंत नवाब आसफ-ज्याह यांजवळ आहेत. तेथील खंडणीचे रुो तीन लक्ष नवाबास द्यावयाचा करार केला. मध्यें बिदनूरकराने कांही संशय धरिला. याजकरितां नारोपंत येहीं आपला लेक बिदनुरास पाठविला होता तेथून केल्या करारप्रमाणें द्यावयाचा बंदोबस्त करून आला. नवाबास येक पालखी चंदनाची बहुत उतम व दांडीहि तारफेची व दोन हती, त्यामध्यें येक मोठा व येक लाहान व पांच घोडे उतम याजमधे च्यार नवाबास व येक मीर महमद हुसेनखान दिवाणास व येक बिलोरी डबा, त्याजमध्यें सोनेरी रुपेरी लवंगा, जायफल, येक जायपत्री व येक जहाराची लकडी. ते उगाळून प्रासन केले म्हणजे विष उतरते. याप्रो नवाबांस छ १३

जिल्हेजीं नजर केली. तीन लक्ष रुपयात येक लक्ष रुपये रोख दिले. दोन लक्ष रुपयांचा सावकारी निशा करून दिला. सावकार येका महिनेयानें पैका देणार. मीर मा हुसेनखा म्हणतो की तूर्तच पैका देणें म्हणोन गरीशा पडिला आहे. त्या गोष्टींचा निकाल जाला म्हणजे नारोपंत बिदनुरास जातील. स्वराज्यांतून बिदनूरचा तह करावा याआर्थे नारोपंत राजश्री तुकोपंताजवळ येऊन बोलिले कीं पंतप्रतिनिधि यानी या गोष्टीचा बंदोबस्त करून द्यावयास करार करून आम्हास पत्र पाठविले म्हणजे आम्ही सातारियास येऊन त्यांचे विद्यमानें माहाराज स्वामीस भेटोन बंदोबस्त करून घेऊ. येविषई तुम्ही प्रतिनिधीस लेहून आम्हास पत्र आणवावें. त्याजवरून तुकोपंतीं मान्य करून पत्राविषई प्रतिनिधीस लेहून पाठविले आहे. स्वामीस सेवेसी विदित व्हावयाकरितां विनंती लिहिली आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The Peshwa is informed how the Chief of Bednore satisfied the Nizam with choice presents and agreed to pay a tribute of three lacs annually.*

---

*No. 33]* *[31-12-1745*

छ २६ जिल्हेज

श्री

पुरवणी श्रीमंत राजश्री पंत
प्रधान स्वामींचे सेवेशी

कृतानेक विज्ञापना. नवाब आसफज्याह छ १७ मिनहूस कलबुरगे याचे वाडीहून कूच करून साडेपांच कोश भीमेच्या दक्षणतीरीं सरडगांचे मुकामास आले. पुढे सरसगर आठ कोश सोडून मुरापुराजवळी जाणार. बेरडाचा मुलुक खराब करावा, हा हेत. किलीच नाईक देवदुर्गवाला याचा भाऊ लस्करास आला आहे; त्याची मुलाजमत हिदायेत मोहिदीनखान याचे मारिफतीनें होणार. वहीरजी सलगरहि आठा कोशावर आला आहे, तोहि भेटीस येणार. वहीरजी पांढरा नासरजंगाकडे गेला म्हणोन सेवेसी विनंतीपत्रीं लिहिलें होते. मनास आणिता सुपेयांत सासुरवाडीस आहे. नवाबानें हरकारे पाठऊन, सावनुराकडील वाट चोख करविली आहे. सेवेसी विदित व्हावयाकरितां विनंती लिहा आहे. लस्करांत माहागाई बहुत जाली. दर रुपयास जिनस कणीक सा सेर, हरभरे साडे दाहा सेर, जोंधळे सजगुरे सोला सेर याप्रो। पाड आहे. खुर्दा रुपयाचे छतीस पैसे आलमगीर आहेत. नवाबाचे स्वारीमुळे मुलकाची खराबी बहुत होते. गावाच गाव सिवार लुटून पस्त करितात. काही हाल राहत नाही. सेवेसी

6861

विदित व्हावयाकरितां विनंती लिा आहे. नवाबाचा दरयेक जागां येक दोन रोज मुकाम जाला म्हणजे दियाणाचे मारिफतीने खलवतांत भेट होऊन आज्ञेप्रो वर्तमान विदित करून जावसाल करून घेतों. स्वामीचे पुण्यप्रतापे स्वामींचे मनोदयानरूप कार्य होतच आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Raghunath Ganesh reports to the Peshwa the Nizam's move from Kalburga to Saradgi in the direction of Savanur.*

---

*No. 34*] [*4-1-1746*

२२ जिल्हेज.

श्री

पुरवणी श्रीमंत राजश्री पंत
प्रधान स्वामीचे सेवेसी

कृतानेक विज्ञापना. छ २२ जिल्हेजी राजश्री अंताजी सिवदेव यांजकडून जासूदजोडी राजश्री तुकोपंताकडे पत्रे घेऊन आली. त्या पत्राचा मजकूर मारानिले यानीं सेवकाजवळ गुप्त रक्षिला. सेवकानें युक्तीनें तीं पत्रे हाताखालीं घालून त्यांतील मजकूर मनास आणितां लिा आहे कीं बाबूजी नाइकांस आमचे भेटीचा हेत होता. आम्हीं माइणीचे मुकामास आलों. नाईकहि त्याच मुकामास आले. परस्परें भेटी जाल्या. आम्ही त्यांचे डेन्यास गेलों. ते आमचे डेन्यास आले. परस्परें वस्त्रें जालीं. नाईक बोलिले की आमचा हेत आहे कीं तुम्ही आम्ही येकं व्हावें. येनदा आमचे चितांत प्रथम नवाबासी गांठ घालावयाचे आहे. मग आम्हीं नवाबास मोडिले तन्ही व नवाबाने आम्हास मोडिलें तन्ही लौकीकच आहे. ऐसे असतां नवाब तहावर आला तर उतमच आहे. सुलतानजी निंबाळकराचा व जानोजी निंबाळकराचा व आपला येक विचार जाला आहे. येनदां नवाबासी मुकाबला केलिया विराहित आम्हीं कर्नाटकांत जात नाहीं म्हणोन नाईक बोलिले. आमचे चितांत नाइकांस सामील व्हावयाचें आहे; परंतु तुमचे विचारावर आहे. तर तेथील नवाबाची मर्जी कसी काय आहे? नवाब कोणेहेकडे जाणार याचा विचार तपसीलवार लेहून पाठवणें म्हणोन पत्रांत मजकूर आहे; व सदासिव येमाजी यानीं याच जोडीबरावर देवराव प्रतिनिधीकडील तुकोपंताअगोदर लस्करांत आला आहे, त्यास पत्र लिा होतें; त्या लखोट्यावर नाव तुकोपंताचे नाव होतें. याजकरितां तुकोपंती लखोटा फोडला. त्या पत्रांत लिा आहे कीं कितेक संकेताच्या गोष्टी प्रधानपंतास कलों देऊं नयेत, म्हणोन तुम्ही लिा तर कलों देत नाहीं. तुमची पत्रे वरचे सातारियास पाठविली, त्याची उत्तरे तुम्हास येतील. वरकड पंत प्रतिनिधि व पेशवे येक जाले. उभयतांचे वकील येकत्र

नबाबाकडे गेलेच आहेत, हे प्रसिद्ध आहे म्हणोन लिा आहे. मग कोणता मजकूर हें कलत नाहीं. देवराव वकील पुरेयात गहात नाही. आबुल खैरखानाचे डेन्याजवळ राहातो. वकीलपुरेयात तुकोपंत आहेत. आढलले वर्तमान सेवेसी विदित व्हावयाकरितां विनंती लिहिली आहे. तुकोपती नबाबास वस्त्रे आणिली ती छ २२ मिनहूस नबाबास रुजू केलीं; परंतु तुकोपंताग्वेरीज केली. सेवेसी विदित व्हावयाकरिता विनंती लिा आहे. सेवेसी शृत होय हे विज्ञापना. वस्त्रे २ मंदिले जामवारे बादलाई २ दुपटा बादलाई २ व पटके गुजराथी २ व किनखाब येक याप्रो वस्त्रे आहेत. हे विज्ञापना.

*¶Raghunath Ganesh reports to the Peshwa the secret correspondence between Babuji Naik and Antaji Shivdeo which the writer cleverly obtained. Babuji Naik therein represented to Antaji Shivdeo how greatly advantageous it would be for them to work in co-operation in the Karnatak and oppose the Nizam. Antaji Shivdeo, it may be well to remember, entered Karnatak on behalf of the Pratinidhi. Tukopant mentioned in the letter was the Pratinidhi's agent residing in the Nizam's Camp.*

---

*No. 35]* *[Jan. 1746*

**श्री**

पुरवणी श्रीमंत राजश्री पंत
प्रधान स्वामीचे सेवेसी

कृतानेक विज्ञापना. सेवेसी विननपित्रें लिहीत असतां बाबूजी नाइकाकडील जासूद आढलला. त्याजवळ वर्तमान मनास आणितां बोलिला की नाईक कातरखटावापुढे अलंद म्हणून गाव आहे ते जागां आहेत. समागमें च्यारेक हजार राऊत आहेत. आबाजी नाईक मागाहून दोन हजारांनसी येत आहेत. विरापा चहू हजारानसी येत आहेत. आपल्यास नाइकास सोडून आठ रोज जाहाले. नाइकांनी येनदा च्यालीस पनास हजार फौज धरिली आहे. येकल्या विरापास तीन लाख रुो दिल्हे आहेत. इतके रोजांत मिरज दाखल जाले असतील म्हणोन बोलत होता. नाइकाकडील वकील माहादाजीपंत म्हणौन औरंगाबादचा राहणार ये जागा लस्करात आहे म्हणौन सांगत होता. महादाजीपंत ये जागां दरबार रुजू आहे, परंतु दरबारी जात नाही. आटलले वर्तमान सेवेसी विदित व्हावयाकरितां विनंती लिा आहे. मागाहून आढलल्याप्रो वर्तमाने सेवेसी विनंतीपत्रीं लेहून पाठविती. सेवकास राव प्रतिनिधीचे कामाकरिता स्वामींने राजश्री तुकोपतावरावर पाठविलें, त्या आज्ञेप्रों राहावे लागते. राव

प्रतिनिधींचेहि येक पत्र सेवकास आले कीं तुम्ही तुकोपंत येक विचारें राहणें; त्याप्रां त्यांचे समाधानें असलियानें स्वामीस संतोष असें जाणोन त्यांचे जवलच राहिलों आहों. सेवेसी विदित व्हावयाकहितां लिा आहे. सेवक अज्ञान आहे. परामर्ष करणार व अपराधांची क्षमा करणार स्वामी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The Peshwa is informed of the progress of Babuji Naik's expedition into Karnatak, and his plans to overcome the Nizam.*

---

*No. 36*] *[17-2-1746?*

छ ७ रविलोवल

## श्रीशंकर

तीर्थरूप राजश्री भाऊ स्वामी
वडिलांचे सेवेसी

अपत्ये रघुनाथाने चरणावरी मस्तक ठेऊन सा। ना। वि। येथील कुशल ता। फाल्गुन शुध अष्टमी इंदुवारपावेतो वडिलाच्या आसीर्वादेकरून सुखरूप असो विशेष. आज तीर्थरूपाचे कूच झालें. तें निंबास गेले. येवतेश्वरास जाऊन जाणार. उद्या वाईस जातीलसे वाटते. बराबर फौज सात आठसे आहे. आम्हाबराबर सोळासे सतरासे फौज ठेविली आहे. आम्हास उद्या प्रातःकाळीं मुकामास बलाविले आहे. वाईस न्यावयाचे तीर्थरूपाच्या चितात आहे. नेले तर पाहावे. बहुत काये लिहिणे हे विज्ञापना.

¶*Raghunathrao writes to Bhausaheb saying that Nanasaheb has left for Nimb and will thence proceed to Wai and that he (the writer) is likely to accompany him to that place.*

---

*No. 37*] *[28-3-1746*

## श्री

श्रीमंत राजश्री रामचंद्र बाबा
स्वामी गोसावी यांसी

पोष्य विसाजी दादाजी नमस्कार विनंति. येथील कुशल ता। चैत्र वद्य ३ मो। का। सिरोंज जाणून स्वकीये लेखन करावयासी आज्ञा केली पाहिजे विशेस. सविस्तर वर्तमान मातुश्री ताईच्या पत्री लिहिले आहे त्यावरून कळो येईल. श्रीमंताचे आज्ञेप्रमाणे येथे येऊन आठदाहा दिवस मुकाम करून राहिलो.

पुणाहून स्वार जाल्यापासून रा बापूजी महादेव याजकडे सात जोड्या कासिदाच्या रा केल्या अद्याप येकहि पत्राचे उतर नाही. काये मनसबा जाला आहे हे न कले. येथे कितीक दिवस मुकाम करावा! पुढे छत्रपुराकडे जावे तरी तिकडे धामधुमेचा प्रसंग जाला आहे. पुढे पर्जन्य समीप आला. दाहा हजार यात्रा समागमे मिळाली आहे. दिलीचे पत्र दस्तक न ये आणि गेले कासीद ते माघारे येत नाही. वकिलाचाहि जाब येत नाही. पुढे काये करावे ते आज्ञा करावी. त्याप्रमाणे वर्तणूक करू. सिरोंजेस दस्तक व राऊत आणविले त्यांचा खोलंबा होईल, याजकरितां श्रीमंतानी उज्यनीवरून जाऊ दिल्हे नाही. हाली येथे येऊन बैसलो. आपणास कळावे याजकरितां लिहिले आहे. मातुश्रीस पायाच्या वेथेने फार बरे वाट(त) नाही; येक वेळ श्रीदर्शन होये ते करावे! बहुत काय लिा कृपा लोभ असो दीजे हे विनति.

¶*Visaji Dadaji writes to the Peshwa that the party of Kashibai proceeding on pilgrimage has now swollen to ten thousand pilgrims. He bitterly complains of the difficulty of securing passports from Delhi.*

---

*No. 38]* *[29-4-1746*

श्री

श्रीमत राजश्री रामचंद्रबाबा
स्वामी गोसावियासी

पोष्य विसाजी दादाजी नमस्कार विनंती येथील कुशल ताा वैशाख वद्य पंचमी जाणून स्वकीय लेखन करावयासी आज्ञा केली पाहिजे विशेष. राजश्री नारोपंतास फौजेसहित पाठविले आहेत हे काळपीच्या घाटाखेरीज दुसऱ्या घाटे उतम वाट काढून येमुना उतरून देतील म्हणून आज्ञा केली, त्याप्रमाणेच काळपीचा घाट सोडून भदेखच्या घाटास आलो. घाट उतम सापडला. पाई-उतारा सर्व यात्रा उतरली. या उपरी पुढे प्रयागास जातो. वरकड रा नारो-पंत आले यांणी मातुश्री ताईची मर्जी उतम प्रकारे राखोन पाचसात दिवस उतम प्रकारे सेवा केली. हली मातुश्री ताईनी निरोप मारनिलेस देऊन तुम्हाकडे रवाना केले आहेत. कळले पाहिजे. बहुत काये लिहिणे कृपा लोभ असो दीजे हे विनंति.

¶*Visaji Dadaji writes to Ramachandra Baba communicating the safe arrival of the pilgrim party at the Jumna whence he says they will proceed to Allahabad.*

No. 39] [7-6-1746

श्री

शेवेसी विज्ञापना जैतपुरास आलो तो आगोधर रा। जयांपा यानी मोर्चे लाविले होते. किलियातून येक दोन वेळा चांगले माणूस बाहेर निवोन सलाबत बरीच घातली. कहीकवाड बाहेर जाऊ पावत नवते. धान्याची महर्गीहि बहुत जाली. बुंधेले फौजसुधा जमा होऊन भोंवताले ठाणीठुणी मातबर तेथे जमाव करून लस्करावर अवाई करून फौज उठवावी हा इत्यर्थ होता, तों त्या समई आम्ही येऊन पोहचलों. सर्व वृत मनास आणून भोंवताले दोन च्यार जागे मातबर मातबर होते त्याजवर पथके रवाना करून मोडून ताराज केले. धान्याची समृध्य करून कहीकवाड मोकळे करून मोरचे कायेम केले. सुरंग लाऊन शह जबर पोहचाऊन रा। जयाजी सिंदे याचे फौजेने व त्यानीहि जातीने मेहनत उतमच केली. स्वामींचा प्रताप थोर यामुळे कार्य सिध जाली. किला फते जाला. तेथे ठाणे ठेऊन कूच करून बुंधेले खासा होते तेथे येऊन गांठिले. जेर करून सिकस्त केले. अंनयीण सुजले तेव्हा तहास येऊन मातबर पांच पाठऊन तह केला. पंधरा लक्ष बाकी, येकवीस लक्ष साल हाल येकूण छेतीस लक्ष रो करार जाले. चौथाईचा मुलूक सध्या तोडू न द्यावा, बोला मुकदेव व कृष्णसिंग व रायाराव जगतराज याजकडील व सभासिंगाकडील हौसराज बक्षी आणकीहि येक दोन आसामी पाठऊन दिधल्या. दोवा राजियाचे लेकमात्र वोलेस येणे राहिले. त्यासी आणावयासी स्वार त्याचे आमचे रवाना केले होते, ते दोन्ही मुले आलियाउपरी कूच करावे यैसा करार होता. त्यासी त्याची पोटाविण विपत्यें बहुत जाली. खाश्यास मीठ मिलेनासे जाले. त्यानी सांगून पाठविले, परंतु आम्हापासून प्राप्त न जाले. आणखीं की निरोप आला की जे मातबर माणूस होते ते पाठऊन दिल्हे. मुलेहि दोचौ रोजानी येतात. आम्हीच येऊन तुम्हा सेजारी राहतो, मग काये चिंता आहे! तुमच्या करारा प्रा। कार्ये विलहेस लाऊन मग तुम्ही कूच करणे. आम्हीहि आज्ञा घेऊन जाऊन, परंतु आनाची मोकलीक करणे, बहुत विपत्ये जाली आहे. आम्हावर द्रिष्टी देणे. यैसी बहुत प्रकारे आजीजी केली, परतु राजश्री बाबाचा कारभार येक वोढी, मूल तर अज्ञान न अयेकत. त्यांची माणसें पोटानिमित्यें लस्करात येत त्याची विपत्ये होयें. जागा जागा लुटीत. आम्ही आग्रह करून करावें तरी कार्ये मोठे, निमित्यास भ्यावे. करार जालियाउपरी त्याची विपत्ये होऊ लागली. मामला निर्गमास पंधरा रोज पाहिजेत. त्यासी परिछिन सांगून पाठविले की कुली गुंता उरकलियावर मग अनाची मोकलीक करून. दुसरे यैसेहि कोणी भये दाखविले

की थोडसीयाच्या राज्याप्रमाणे करणार. बरकंदाज मिळून तमाम पळो लागली तेव्हा त्याजलाहि विस्वास पुरेनासा जाला, तेव्हा पळोन गेले. पाठी लागून उंटे थोडी हती काही लुट जाली. पळोन आज्यागडी कालिंजरावर गेले. मग सहजच राहणे जाले. छावणी करावीसी जाली. मग जागा जागा फौजा पथके रवाना करून मुळकास कौल देऊन लावणी करून तहसील चाली लावावीसे केले आहे, परतु पैका मातवर येणे. छेतीस हे व हाली साल थैसे मिळून कमजादा साठी येणे, अमल बसणे. बुंधेले तों कालिंजरापासी प्रस्तुत आहेत. प्रस्तुत हतवीर्ये जाले. पुढे कैसे करतील ते पाहावे. फिरून पूर्ववत प्रा विल्हेस लावावे या लागी आहेत, परतु आमची वासना जाजती करावे. होता होऊन येईल ते करून. शेवसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Malharrao Holkar reports to the Peshwa the capture of Jaitpur and the attitude of Jayappa and Ramchandra Baba.*

---

*No. 40]* *[3-3-1757*

**श्री**

श्रीमंत राजश्री पंतप्रधान
स्वामीचे सेवेसी

विनंति सेवक तुवाजी अनंत सा। ना। विनंति सेवेसी प्रार्थना ऐसीजे ता। छ १२ जाखर मु॥ कुरा जाहानाबाद आंतरवेदी स्वामीचे कृपादृष्टीकरून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष. बागलकोटचा मुक्काम * * * स्वामींची पत्रे आली वर्तमान त्यागायेत * * * * त नाही. कालपीच्या तलावरून शेवसी * * पत्रे पाठविली ती पावली असतील. तेथून कुच तिसरे दिवसी श्री ब्रम्हावर्तास गंगातीरास गेलो. स्वामीचे कृपाकटाक्षे येथा * * , * * तीर्थविध श्रीगंगास्नान चवदा दिव * जाहाले. तीर्थरूप मातुश्री बाई व सर्वत्रानी संपादिला. इतकी दिवस राहावयास कारण आयुध्येचा सुभियाचा व बळवंतसिंग कासीचा राजा याने चार्णाचा किला घेतला म्हणून चालोन दहापंधरा हजारानिसी कासीस आला. बळवंतसिग पळोन डोंगरी गेला. मातबर लोक कासी टाकून गेले यामुळे तिकडे धुंद जाहाली. आम्ही पुढें जाऊन कोठे राहावें! हें जागा आपली चौकडे जाणून राहाणे जाहाले. मग नवाबास व प्रयागच्या सुभियास स्वामीची पत्रे होती ती पाठविली. सवेच मागती मातुश्री बाईच्या नावे कागद व राजश्री गोपाळराऊ गणेश याकडील नारोपंत म्हणून गृहस्थ होता त्यास नवाबाकडे पाठविला. त्याणे मुलाजमत केली. पत्रे गुजरान-

दिवाकरी प्रतिउतर व दत्तणिराये प्रयागच्या मुनिसाचा दिवाण पाठविल्या त्याची पत्रें व वकिलाची पत्रें येतान, दुसरे दिवसी निनेडीस आलो. तेथून * * यादन छा मरी येथे आलो. उदईक मजल दरमजल प्रयागास जाऊ. या रा गोविंद बल्लाल रा गोपाळराव गणेश फौजेनिसी आहेत. त्यास प्रयागपावेतो घेऊन जाऊ. त्या विचारासारिखे प्रयागाहून त्यास * * समागमेंच फौजेनिसी गंगापार होऊ * * * हरि विठल यासी काल्पीहून ब्रम्हावर्तापावेतो आणिले होते त्यांचे लग्न होणे याकरिता ते निरोप घेऊन काल्पीस गेले. पुढे जाणियाचे स्वामीचे पुन्य समर्थ आहे. कोणे गोष्टींची चिंता आहे ऐसे नाही. अमचा वकील व दत्तणीराय आपले सरदेस प्रयागा अलिकडे आहे. कोसावर भेटीस येणार. स्वामीच्या पत्राची उत्तरे ते घेऊन येणार आहेत. भेटी होतील. सेवेसी विदित होये हे विज्ञाप्ति.

¶*Tubaji Anant writes to the Peshwa the programme of Sagunabai's pilgrimage describing incidentally a scuffle between Balvantsing of Benares and the Subhedar of Oudh—which he says was the reason why the party of pilgrims was detained at Brahmavart.*

---

*No. 41]* *[About July 1746*

श्री

पुा श्रीमंत राजश्री
नाना स्वामीचे सेवेसी

विज्ञापना सविस्तर वर्तमान तीर्थरूप मातुश्री ताईच्या पत्री लिहिले आहे त्यावरून विदित होईल. वरकड मातुश्री ताईच्या पायाची वेथा पहिली होती त्याप्रमाणेच आहे. दो रोजानी चहू रोजानी ज्वरहि थोडा बहुत येत असतो. मी त्यांचे आज्ञेप्रमाणे वर्तणूक करितो. वेदमूर्ति राजश्री दीक्षित नित्य येत असतात. दानधर्म करणे तो त्यांचे विचारे करितो, विदित जाले पाहिजे. स्वामीची आज्ञा वरच्यावरी येते की ताईचे मर्जीप्रमाणे वर्तत जाणे. तरी मातुश्री ताईचे आज्ञेवितरिक्त दुसरी जोड कोणती आहे? मर्जीप्रमाणे वर्ततो. वरकड रा कृष्णाजी नाईक जोसी याची स्त्री सौभाग्यवती मातुश्री काकू याणी मजपासी निरोप सांगितला की श्रीमंतास माझा निरोप लिहोन पाठविणे की नाइकास आठ हाजाराचे व्याजाचे देऊ केले आहेत त्यांपैकी मजला खर्चास ग्यासगत पाचशे रुपये येथे पाठवावे. वरकड राहिले ते नाइकास द्यावे. मग पुढें मी त्याजवळ सांगेन. येणेप्रमाणे दोन च्यार वेळा त्याणी सांगितले. त्यावरून विनंती लिहिली आहे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*This letter possibly from Visaji Dadaji gives details to the Peshwa about Kashibai's pilgrimage.*

6868

No. 42] [14-7-1746

श्री

श्रीमंत राजश्री रामचंद्र
बाबास्वामी गोसावी यासी

पो विसाजी दादाजी कृतानेक नमस्कार विनंति. येथील कुशल ता श्रावण शुध सप्तमी इंदुवार मुा श्री विश्वनाथनगरी जाणून स्वकीय कुशल वर्तमान लेखन करीत असावे विशेष. आपण पत्र पाठविले ते पावोन परम समाधान जाहाले. आपल्या लिहिल्याप्रमाणेच वेदमूर्ति राजश्री नाना दीक्षितांचे आज्ञेवरून वर्तणूक करितो. येऱ्यास मातुश्री ताई येथे येताच त्यांस जागा राजमंदिरी राहावयास बलवंतसिंगाने करून दिल्हा. वरकड घोडी उंटास सिलेदारास वोस (ढ) काठांत जागा दिल्हा त्याप्रा राहिलो. त्यास आठ रोजामध्यें सरकारची घोडी पांच चोराकडून बलवंतसिंगानी नेविली. येविसी बलवंतसिंगास झट लाविले जे घोडी तलास करून सत्वर पाठऊन देणें. त्यावरून दोन घोडी मात्र दिल्ही. आणखी घोडी येणे त्याचा तलास करून पाठऊन देणे म्हणून सागोन पाठविले यावरून घोडी चोरल्याचा लौकिक होऊन नांव बदु होते येसे बलवंतसिंगाने समजोन केल्या कर्माचे संपादणूक करून चाकरीची दानतदारी दाखवायाबदल मातुश्री, ताईची नालीस मनसूरआलीखानास लेहून पाठविली जे, याचे समागमे फौज आहे त्या लोकाकडून शहरात लोकासी कजिया करितात. अमलाची वाट राहिली याविसी काये आज्ञा ? त्यावरून नवावाने लेहून पाठविले जे गयेस जावयास विदा करणें. हे वर्तमान रा बापूजी महादेवास कलले. त्यास नवाबाकडे जाऊन आपण व कितेक मातबराकडून सागोन पाहिले. त्याचे न आइकिले. तेव्हा फत्तशाहाकडून नवाबास सांगितले. उपरातिक श्रावणमास राहून गयेस जावयाची विदा करणे म्हणून बलवंतसिंगास परवाना दिल्हा तो व कासिदासमागमे तपसीलवार वर्तमान लेहून पाठऊन दिल्हे त्यावरून कितेक मजकूर रा बापूजीपंतास लेहून पाठविला आहे. तोच मजकूर राजश्री सुभेदारास व राजश्री जयाजी सिंदे यांस मातुश्रीनी तपसीलवार लेहून पाठविला आहे, तो मजकूर ध्यानास आणून काये तो विचार लेहून पाठवावा. येथे तो पाहातां अर्थेकडून कोणास काडीमात्र उपद्रव आमच्या लोकाकडून जाहाला नाहीं. मोठी गोष्टी नेलीली घोडी माघारी मागितली म्हणून लबाडी बलवंतसिगाने केली. त्याचे वर्तमान चित्तात आणून बंदोबस्त करून येथे राहाणे कार्तिक पौर्णिमापावेतो होये ते करणें. जे वर्तमान होईल ते आपणास ल्याहावे, मग त्याचा विचार कर्तव्य तो आपण करितील. श्रावण जालियावरी हा जा म्हणेल तेव्हा पुढे जावे तरी पर्जन्य बहुत. मार्ग चालत नाहीं. उंट न चालत.

6869

पुढे जाणे कैसे होईल हेच संकट आहे. दिलीसहि रा। त्रापूजीपंतास लेहून पाठविले आहे. याचे उत्तर पाठवावे त्याप्रमाणे वर्तणं करू. बहुत काये लि।। कृपा असो दीजे हे विनंति.

रा। रघोजी भोसले कोठे आहेत ते लिहणे म्हणून लि।। त्यास रघोजी भोसले नागपुरास वराडात गेले. हे विनंति.

¶*Visaji Dadaji describes to Ramchandra Baba how the party with Kashibai was received by Balvantsing of Benares, how he carried away their horses and how he misrepresented the matter to the Nawab. The writer asks the addressee to communicate all this to Jayaji Sindia and to request him to intercede for the party with the Wazir.*

---

*No. 43*] [*11-11-1746*

श्री

चिरंजीव राजमान्य राजश्री नाना प्रति राधाबाई आसीर्वाद उपरी. येथील कुशल ता। मार्गसीर्ष शुध १० मंगळवारपावेतो जाणून स्वकीय लेखन करीत जावे विशेष. पत्र पाठविले ते आज प्रातःकाळी पावोन लेखनार्थ अवगत जाहाला. त्याजवरून चिरंजीव सौभाग्यवती भिऊबाईकडे बारामतीस पत्र पाठविले आहे की सातारियास न जावे म्हणोन. वरकड पूर्णिमा जाहालियानंतर चिरंजीव उभयतांस सौभाग्यवती गोपिकेस सातारियास पाठवितो. यानंतर उभयता नाईक उपोशणे करितात, अत्याग्रहास प्रवर्तले आहेत, याविसी पूर्वीच पत्र पाठविले आहे. वारंवार त्याहावेसे काये आहे ? जे गोष्टिने जीव वाचेत तो अर्थ केला पाहिजे. बहुत काये लिहिणे हे आसीर्वाद.

¶*Radhabai asks Nanasaheb to intercede for and save the life of Abaji and Babuji Naik who have started fasting. She has asked Bhiubai not to proceed to Satara.*

---

*No. 44*] [*27-11-1746*

श्री

श्रीमंत राजश्री पंत
प्रधान स्वामीचे शेवेसी

विनंति सेवक गोविद कृष्ण कृतानेक सा। ना। विज्ञापना. येथील क्षेम ता। कार्तिक वद्य नवमी जाणून लोकसह वर्तमान सेवकाचे वर्तमान यथास्तित असे विशेष. श्रीहून मातुश्री ताईसमागमे सेवा करीत मजल दरमजल गयेस गेलो. सेवेसी श्रृत होये हे विज्ञाप्ति.

¶*Govind Krishna who accompanied Kashibai in her pilgrimage reports to the Peshwa their arrival at Gaya.*

'*No. 45*] [*Recd. 27-12-1745*
पा छ १४ जिल्हेज

श्री

पुरवणी श्रीमंत राजश्री पंत
प्रधान स्वामीचे सेवेसी

कृतानेक विज्ञापना. नवाब नासरजंगाहीं नेवासे वैजापूरचे मजकुरात स्वामींचे सेवेसी पत्र लिहा आहे. ते थैली येक व राजश्री धोंडो माहादेव यांची हवेली शहरांत आहे. ते नवाब आसफज्याह येही जळगाव जावुतकर जमिदारांचे चुकर्लावरून जप्त करविली. त्या मजकुरांत स्वामीने नासरजंगास लिहा होते. सेवकानेहि जाबसाल करावयाचा केला. त्यावर बोलिले, की आम्ही लस्करास जातो तेथे गेलियावर या गोष्टीचा फैसला करून देतो. त्या मजकुरांत स्वामीचे पत्राचे उत्तर सेवेसी लिहिले आहे ते थैली येक येकूण दोन थैलिया अजूरदाराबरावर सेवेसी पाठविलिया आहेत प्रविष्ट होतील. सोमवंशी यांजकडील कर्जाचे मजकुराबाबत व सेवकाने नवाबास मजकूर विदित केले त्याजवाा नासरजंगांचीं खते सेवकाजवळ येऊन पावली म्हणजे मागाहून सेवेसी रवानगी करितो. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना. शहरी माहागाई वहुत जाली. सजगुरे रुपयाचे तेरा सेर व त्याचप्राो जोंधळे हरभरे आहेत. गहू आठ सेर, तांदूळ सात सेर याप्राा आहे. सेवेसी श्रुत जाले पाहिजे हे विज्ञापना. नवाब नासरजंगाबराबर स्वार येक हजार आहेत. बराबर येक तोफ शंभर बैलांची आहे व काही बाणाचे उंट आहेत. खोजमकुलीखान व सेखअली जुनेदी समागमे आहेत. बकरीद जालियावर रहिमुलाखान याजखानाचे बेटे शहरीहून लस्करास जाणार आहेत. हे विज्ञापना.

¶*Raghunath Ganesh writes to the Peshwa news from Nasarjang. He also writes on the subject of the debt being recovered from Somawanshi.*

---

*No. 46*] [*15-1-1747?*

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान
स्वामीचे सेवेसीं

विनंति सेवक शंकराजी केशव साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ १४ मोहरमपावेतों स्वामीचे कृपावलोकनें करून येथील सेवकाचें व प्रांत मजकूरचें वर्तमान यथास्थित असे विशेष. पेशजीं विनंतिपत्र फिरंगी फरासीस गोव्यास

---

१ पत्र रघुनाथ गणेशाचें.

माहे मोहरमपावेतो येथास्थित असे. नवाब आसफज्याह सदे जालियावरहि च्यार रोज त्याच मुकामी होते. राजश्री बाबूजी नायकाकडील बालमुकुंद वकील येथे आहेत. त्यांचे बधु नायकाजवळोन छ १४ मोहरमी लस्करास आले. त्यांनीं वर्तमान आणिले की नाईक इंदापुरास आले. तेथून पंढरपुरास येतील. अविलंबे नवाबांचे दर्शनास येणार. हे वर्तमान नवाबास कळली (यावर) नवाब येहीं कलबुरगेयाचे रुखे छ १९ मोहरमीं कूच करून च्यार कोश आले. आजहि कूच आहे. पुढे चारापाणी पाहोन आठ दाहा मुकाम करणार आहेत. छ १२ मोहरमी निजामअलीखान बाहादर असदजंग कूच करून रघूजी भोसले यांचे तंबीस रवाना जाले. त्याची स्वारी माहोरपर्यंत होईल. नवाबाही येथे समीपच काहीक दिवस मुकाम करून राहतील. बाबूजी नाईक याचे मनोधारण करावे हे गोष्ट नवाब असफज्याहास अवश्यक आहे असे दिसते. कारण हेच की थापडवाईक विचार, दिल्हे तितकेच घेतील. नवाब नासरजंगास शरिरी सावकाश नाही. जुलाब घेतला आहे तेहि श्रमीच आहेत. नवाबानें मीर मा हुसैनखान दिवाण तगीर करून पूर्णचंदास दिवाणगिरी जाली. पराडे यांचा किलेदार तगीर केला व येक रिसालदार दोन हजार स्वारानसी पाठविला त्याणे अवाडचे किल्हेयात राहावें म्हणोन आज्ञा केली आहे. राजश्री मुलतानजी निंबालकरास न(वा)बानें पैगाम केला की, आम्ही बीड, पाथरीं तुम्हास दिली आहे येशास प्रस्तुत वर्तमान आहे सदरहू दोनी परगणे हुजरून शाहजादेयास जागीर जाली आहे. असो येथे आमचा उपाय काय? आम्ही तुम्हास दुसरी जागीर देऊ. नवाब नासरजंगाही त्यांचे समाधान केले की तुम्ही येक परगणा शाहजादेयास देणे व येक परगणा शाहजादेयाजवळोन तुम्हास इजारा देऊन म्हणौन. येशास या मजकुरावरून राव मारानिले श्रमी आहेत. बोलिले कीं सदरहू जागीर तगीर जालियावर आम्ही नौकरीचा इस्तिफा देऊन. आम्हास गनिमाईकडे जाणे नाहीं. म्हणौन बोलिले. येसा मजकूर जाला आहे. पुढे काय होईल ते पाहावे. हे वर्तमान पणीखान पठाणाचे वकील राजश्री गणेशपंत आहेत ते नवाबाचे दिवाणखानेयांत जात असतात त्यानीं सांगितले. तें सेवसी विदित व्हावयाकरिता विनंती लि॥ आहे. सत्य मिथ्य कळत नाही. वरकड वर्तमान दरबारचे राजश्री बगाजीपंती सविस्तर सेवेसी विनंती लि॥ आहे त्याजवरून विदित होईल. सेवकास खर्चाविपई लस्करात आवाल बहुत आहे तो मजकूर लिहितां येत नाहीं. स्वामींनि कृपाळु होऊन खर्चाचे बेगमीची आज्ञा केली पाहिजे व चोपदाराचेहि रोजमरे याची आज्ञा करावयास स्वामी समर्थ आहेत. नासरजंगाचे विचार सेवकास हुजूर रवाना करावें असे आहे: नवाब आसफज्याहची मुलाजमतहि

6873

तेयार होऊन निघाला आहे म्हणून अजम जनराल मुंबईकर यांनी पत्र पाठविलें होतें व भिकम भट मुंबईकर याची सिबाड गोव्याहून आली तिचे तांडिलाने सांगितलें त्यावरून सेवेसीं लिहिले होतें, त्यास सांप्रत आधिकोत्तर टोपीकराचे वर्तमान नाहीं. राजश्री रामचंद्र हरि येथें दीड हजार राउतानसीं आहेत. आणिखीं फौज स्वामी पाठवितील तर न पाठवावी व साष्टीस राजश्री लक्ष्मुमण बल्लाल पांचसे राउतानसीं आहेतच. दुसरे फौजेचें अगत्य प्रस्तुत नाहीं. याजकरितां दुसरी फौंज न पाठवावी सेवेसीं विज्ञापना.

¶*Shankaraji Keshao writing from Bassein asks the Peshwa not to send more forces, as the Portuguese were not reported to be aggressive.*

---

*No. 47*] [*About 1-1-1747*

श्री

पुरा राजश्री रामचंद्र
बावा स्वामी गोसावियासी

विनंतिं उपरी. नवाब अमीरखान मारल्याची खबर येथे आलियामुळे थोडीबहुत येथे जमींदाराची वगैरे गडबड जाली आहे. जोपर्यंत दिलीहून दुसरा सुभा अगर पहिल्यांकडील करार होये तोवर काही गडबड व्हायासी राहाणार नाही. आनि. शिवरात्रपर्यंत आमचा मुकाम येथे आहे. यात्रा बहुत समागमे आहे याजकरिता येमुनापार विसापंचविसा कोसावरी दोन हजार फौज ठेवावी म्हणजे इकडे काही गडबड जाली तरी येमुना येथेच उतरोन पार येऊ. यात आपल्या विचारास येईल तैसे करावे. सूचनार्थ लिहिले आसे. बहुत काय लिहिणे लोभ असो दीजे हे विनंति+.

¶*Ramchandra Baba is informed of the confusion created by the murder of Amirkhan and the general disorder in the Province and is requested to post a guard of two thousand near the Jumna so that the pilgrims can cross without molestation.*

---

*No. 48*] [*28-1-1746*

श्री

श्रीमंत राजश्री पंत
प्रधान स्वामीचे सेवेसी.

विनंती सेवक रघुनाथ गणेश चरणावरी मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार कृतानेक विज्ञापना. स्वामीचे कृपाअवलोकनेंकरून सेवकाचे वर्तमान ता। छ १६

---

+ अमीरखानाचा खून २५-१२-१७४६ रोजीं झाला, सबब पत्र अदमासे जानेवारी १७४७ मधील धरलें आहे.

माहे मोहरमपावेतो येथास्थित असे. नवाब आसफज्याह सदं जालियावरहि च्यार रोज त्याच मुकामी होते. राजश्री बाबूजी नायकाकडील बालमुकुंद वकील येथे आहेत. त्यांचे बंधु नायकाजवलोन छ १४ मोहरमी लस्करास आले. त्यानीं वर्तमान आणिले की नाईक इंदापुरास आले. तेथून पंढरपुरास येतील. अविलंबे नवाबांचे दर्शनास येणार. हे वर्तमान नवाबास कलली (यावर) नवाब येहीं कलबुरगेयाचे रुखे छ १९ मोहरमीं कूच करून च्यार कोश आले. आजहि कूच आहे. पुढें चारापाणी पाहोन आठ दाहा मुकाम करणार आहेत. छ १२ मोहरमी निजामअलीखान बाहादर असदजंग कूच करून रघूजी भोसले यांचे तंबीस रवाना जाले. त्याची स्वारी माहोरपर्यंत होईल. नवाबाही येथे समीपच काहीक दिवस मुकाम करून राहतील. बाबूजी नाईक यांचे मनोधारण करावे हे गोष्ट नवाब असफज्याहास अवश्यक आहे असे दिसते. कारण हेच की आपडवाईक विचार, दिल्हे तितकेच घेतील. नवाब नासरजंगास शरिरी सावकाश नाही. जुलाब घेतला आहे तेहि श्रमीच आहेत. नवाबानें मीर मा हुसेनखान दिवाण तगीर करून पूर्णचंदास दिवाणगिरी जाली. पराडे यांचा किलेदार तगीर केला व येक रिसालदार दोन हजार स्वारानसी पाठविला त्याणे अंबाडचे किल्हेयात राहावे म्हणौन आज्ञा केली आहे. राजश्री मुलतानजी निंबालकरास न(वा)बाने पैगाम केला कीं, आम्हीं बीड, पाथरी तुम्हास दिली आहे येशास प्रस्तुत वर्तमान आहे सदरहू दोनी परगणे हुजरून शाहजादेयास जागीर जाली आहे. असो येथे आमचा उपाय काय? आम्ही तुम्हास दुसरी जागीर देऊ. नवाब नासरजंगाही त्यांचे समाधान केले कीं तुम्ही येक परगणा शाहजादेयास देणे व येक परगणा शाहजादेयाजवलोन तुम्हास इजारा देऊन म्हणौन. येशास या मजकुरावरून राव मारानिले श्रमी आहेत. बोलिले कीं सदरहू जागीर तगीर जालियावर आम्ही नौकरीचा इस्तिफा देऊन. आम्हास गनिमाईकडे जाणे नाहीं. म्हणौन बोलिले. यैसा मजकूर जाला आहे. पुढे काय होईल ते पाहावे. हे वर्तमान पणीखान पठाणाचे वकील राजश्री गणेशपंत आहेत ते नवाबाचे दिवाणखानेयांत जात असतात त्यानीं सांगितले. तें सेवसी विदित व्हावयाकरिता विनंती लिा आहे. सत्य मिथ्य कलत नाही. वरकड वर्तमान दरबारचे राजश्री बगाजीपंती सविस्तर सेवेसी विनंती लिा आहे त्याजवरून विदित होईल. सेवकास खर्चाविषई लस्करात आबाल बहुत आहे तो मजकूर लिहितां येत नाही. स्वामीनें कृपालु होऊन खर्चाचे बेगमीची आज्ञा केली पाहिजे व चोपदाराचेहि रोजमरे याची आज्ञा करावयास स्वामी समर्थ आहेत. नासरजगाचे विचारे सेवकाम हुजूर रवाना करावे असे आहे. नवाब आसफज्याहची मुलाजमतहि

करवणार आहेत. ये जागां सेवकानें असावें असे नाहीं. राजश्री बगाजीपंत आहेतच. परंतु नासरजंगाचे आज्ञेप्रो यावें लागलें. पुढें स्वामी आज्ञा कारितील तर यांची आज्ञा घेऊन सेवेसी येतो. येविषई आज्ञा ते प्रमाण. खर्चाची सरंजामाची आज्ञा करावयास स्वामी धणी आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

*¶Raghunath Ganesh, the Peshwa's Vakil at the court of Nasirjang, writes news about the movements of Nizamulmulk, Nizam Ali and Babuji Naik Joshi.*

---

*No. 49*] [*About the end of January 1747*

श्री

पुा राजश्री रामचंद्र बावा

स्वामीचे सेवेसी

विनंति उपरी श्रीहून गयेस जाऊन यात्रा तीस चालीस हजार तेथे जमा जाली. सर्वांचे गया वर्जन होऊन मजल दरमजल प्रयागास येतो. त्यास प्रस्तुत मातुश्री ताईनी विचार केला आहे की येक वर्षपर्यंत आपण श्रीमध्यें राहावे. तुम्हास कोणास राहाणे असेल तरी राहाणे, नाही तर जाणे यैसे म्हणतात. श्रीमंताची आज्ञा तो तिरस्थली यात्रा करून यावे. सोळा महिन्याची वेगर्मा करून दिली. दुसरी गोस्ट श्रीचा अधिकारी आहे त्याची वर्तणूक तुम्हास ठाउकीच आहे. श्रावणमासी लोकानी लबाडी करून लिहिले त्यावरून घालवीत होता. यैसे असोन श्रीमंताचीहि आज्ञा नाही. मातुश्रीस बहुता प्रकारे आम्ही सांगतो परंतु चित्तात काही येत नाही. खावंदासी बळ किती चालेल हे आपणास कळतच आहे. इलाज करून प्रयागपावेतो आली तरी घेऊन येतो. पुढे तेथून देशास येतीलसे दिस(त) नाही. जर करिता आतिशये करून जाऊ लागली तरी याचा विचार काये करावा? आम्ही तो येकटे समागमे, तो जातील तेथे जाऊ. त्याणे इजत कैसी राहात्ये? हा विचार श्रमिंतास लेहून तेथून जाव आणावा तरी दूरपंथ तुम्ही त्यांचे जागा आहा. याचा विचार ठीक करून लेहून पाठवणे. आम्ही व रा कृष्णराव देखील सांगतो. परंतु ती गोष्ट ध्यानास येत नाही. श्रीमध्यें राहाणे तरी मनसुर अलीखानाचे सलुखाखेरीज राहाणे कैसे होईल? तुम्हास सविस्तर कलौन ज्याप्रा त्याहाळ त्याप्रमाणे वर्तणूक करू. उत्तर मुजरद जोडी-समागमे पाठवावे. बहुत काय लिा कृा लोा असो दीजे हे विनंति. याचे उत्तर प्रयागी अगत्य पाठवावे. हे विनंति.

*¶Ramchandra Baba is informed of the unwillingness of Kashibai to return home from Prayag, the holy place of the Hindus, and is asked how to persuade her.*

No. 50] [5-2-1747

श्री

श्रीमंत राजश्री रामचंद्र
बावा स्वामी गोसावी यांसी

पो। विसाजी दादाजी नमस्कार विनंति. येथील कुशल फाल्गुन शुध ७ मु।। श्रीवेणींत जाणून स्वकीय लिहीत गेले पाहिजे विशेष. पूर्वी आपण पत्रें आम्हास व मातुश्री ताईस पाठविली ती प्रविष्ट जाली. सर्व वाचून दाखविली, परंतु काही विवेक करून कूच करावयाचे न करीत. नाना प्रकारे उपाये होते ते केले. तुमची पत्रे व दिलीहून राजश्री बापूजी माहादेव याची पत्रे आली ती व श्रीमंताची वरच्यावरी येतात की सत्वर येणे नीहि दाखविली. त्यावरूनहि काही विचार न होये. तेव्हा रा। कृष्णराव यांणी अतिशये केला की तुम्ही जर येमुना उतरत नाहीं तरी आपण वेणीत जीव देतो येसे म्हणून डेन्यातून निघोन गंगातीरी गेले. समागमे स्त्रीस घेऊन गेले. तेव्हां आम्ही बहुताप्रकारे सांगोन याच्या डेन्याजवळ मातुश्रीस नेऊन त्यास राहाऊन निदानी इतकाच विचार केला की तुम्ही येमुना उतरून काल्पीच्या घाटास चला. तेथे राजश्री मल्हारराव व रा। जयापा व रा। बाबा आहेत ते सांगतील तैसा विचार करावा. इतके ठराऊन येथून कूच करावेसे जाले आहे. उद्या कूच करून पुढे येणार, परंतु विश्वास येत नाही. घडीघडी विचार नवेच होतात. ये सोबतीने यावयाचे आम्ही कबूल करीत नवतो त्यास बहुताप्रकारे श्रीमंतानी सांगोन समागमे लावून दिल्हे. आजीपावेतो तिरस्थळी यात्रा उत्तम प्रकारे सर्वांची जाली, याउपरी हे विघ्न निर्माण जाले. आम्ही गरीब माणूस हे तो संकट येऊन पडिले. जर तुम्हापावेतो पावेसे केले आहे हे घडोन आले म्हणजे पुढे आपण विचार कर्णे तो करतील. आपणहि काल्पीच्या जवळपास असतील तो येथून केल्या कराराप्रो। निभाव जाला तर आठा दिवसी काल्पीस येतो. आपणास वर्तमान कळावे याजकरितां लि।। आहे. जिवावरी उदार होतात. कोणाचा इलाज चालत नाही. याचा इलाज काये करणे तो करावा. बहुत काये लिहिणे लोभ असो दीजे. भेटीनंतर साकल्य विदित करू. हे विनंति.

*¶Visaji Dadaji informs Ramchandra Baba that Kashibai was very reluctant to leave Allahabad, and that it was with great efforts that she was prevailed upon to move to Kalpee where her future programme would be fixed.*

No. 51] [March 1745

पुरवणी

पाठवावे येसा करार जाहाला नाही. करार जाहलियावरी जासुदाची जोडी रवाना करितो. नवाबाचे चितात आहे की नाइकाबराबर फौज देऊन सवणुराकडे पाठवावे. सवणूरचा मोगल नवाबास भेटत नाही. नवाबासहि कष्ट जाहाले आहेत की नाइकास कोन्हीकडे पाठवावे. नाइकाचा करार कोन्हीकडे पाठवावयाचा जाहाला म्हणजे साहेबाकडे जासूदाची जोडी व सविस्तर वर्तमान लेहून पाठवितो. नाइक नवाबाची आज्ञा घेऊन येक दोन मजलीवर गेले म्हणजे आम्ही स्वार होऊन साहेबाचे सेवेसी येतो. नाइकाचे दरबारचे वर्तमान सर्व गणास आणून येतो. याजबराबर फौज तीस हजा(र) आहे. नाईक नित्य मुजऱ्यास जातात. नवाब म्हणतो की तुम्हास कोठे पाठवावे ? नाईक म्हणतात आम्ही माघारे जात नाही. हे वर्तमान कारकून मंडळीचे मुखे ऐकिले. बहुत काय लिा हे विज्ञाप्ति.

¶*A fragmentary letter giving news of Babuji Naik's overtures to Nizam-ul-mulk.*

---

No. 52] [26-5-1745

श्री

श्रीमंत राजश्री पंत

प्रधान स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक रघुनाथ गणेश चरणावरी मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार. कृतानेक विज्ञापना. स्वामीचे कृपादृष्टीनें सेवकाचे वर्तमान ताा छ ५ माहे जमादिलोवलपावेतो मो लस्कर नवाब नासरजंग येथास्थित असे. येथील वर्तमान सविस्तर आदल्ल्याप्रो छ २७ रबिला[illegible] [illegible]गाईत विनंतीपत्रीं लेहून हुजूरचे जासुदाबराबर सेवेसी रवानगी केली आ[illegible] [illegible]विनंतीपत्रे [illegible] [illegible]वेष्ट जालीयावर वर्तमान विदित होईल. छ २८ राा [illegible] दिदा [illegible] [illegible]

अंतराये पंधराविसा कोशांचा आहे. छ २ रोजी नवाबानी नाइकाचे वकिलास बोलाऊन नेऊन खलवत प्रहर दिवस चढलेयावर केले. मागती रुकसत करून तृतीयप्रहरीं बोलाविले. वकील मार तृतीय प्रहरानंतरे गेला, तो चहूं घटिका रात्रीस आला. उतानार्थ मनास आणिता नाइकास नवाबाने येनायतनामा अर्जी नसता लेहविला आहे तेव्हा दिसते की नाइकास आपले हमराहीस बोलावणार. आपण व नाईक मिळोन श्रीरंगपटणकरास शह द्यावा. प्रस्तुत श्रीरंगपटणकर देवन-हलीचे मोर्चेयास आहेत. बारा चौदा हजार घोडा व तीस च्यालीस हजार प्यादा आज पांच सा महिने या मसलहतीस आहेत. सिरेकर दिलावरखानहि त्यास सातशें राऊतानसी सामील जाला आहे. येंशास श्रीरंगपटणकर वाटेवर येत नाही याजकरितां नाइकास समागमे घेऊन जाऊन देवनहालीचा मोर्चा उठवावा, या दबावानें श्रीरंगपटणकर वाटेवर येऊन मामलीयेत चुकवितील म्हणौन तर्क दिसतो. नवाबाचे लस्करांत नाइकाकडील स्वार दाहा पंधरा कोठे काजकामास गेले होते ते येऊन जमा जाले आहेत. त्यास नवाबाचे लस्कराहून नाइकांचे फौजेस सामील होणे मुस्कील पडली आहे. आज पंधरा वीस रोज लस्करातच आहेत. आबाडीस मुधोजी नाइकाचे गोटांत राहतात. नित्य उठोन पछाडीस वकिलाजवल येऊन नाइकाजवल प्रविष्ट व्हावयाचे विचाराकरितां बजीद आहेत. येविसीं वकिलाने नाइकास लिहिले होते. त्याचे उतर आले कीं तुम्ही च्यार रोज लस्करांतच राहणे. यावयाची उतावली न करणे. छ २ रोजीचे खलवतावरून वकील सदरहू जणांस बोलिला की याउपर तुम्ही उतावली न करणे. च्यार दिवस धीर धरिलियाने आपले फौजेस सामील व्हाल. नवाबाचा व नाइकांचा प्रथमच करार जाला होता की काम पडलियास तुम्हास बोलाऊन दर रोज राउतास सा आणेप्रों देऊन कामकाज घेतले जाईल. नाईकहि मोठे हालात आहेत. नित्य उठोन चोरटे उपसर्ग करितात. बैल घोडीं नेतात. नवाबाचे लस्करास जासूद पाठविणें संकट पडिले आहे. भुमेयाची सरहद लागलीयापासोन फारच श्रमांत आहेत. नवाबास भ्रम होता की आपले साहित्यास मुजफरजंग व कडपेकर व कनोलकर व अबदूल मजीदखान व सिरेकर दिलावरखान येऊन सामील होतील, त्यांचे भारवारदारीने हरयेक मनसबा करावा. सेवट आजपर्यंत सदरहू जणापौ कोण्हीहि आला नाहीं व पुढें यावयाची उमेद नाही, याजकरिता नवाबाची तब्रियत बहुत दिक जाली आहे. कितेक वर्तमाने लेहून आसफज्याहाकडे सितूरस्वार रा केला आहे. त्या जाबाची प्रतीक्षा आहे म्हणौन लाहान कूचे करून मुकामे करीत जातात. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*The Peshwa's Vakil Raghunath Ganesh writes news about the movements of Nasirjang and Babuji Naik and the negotiations and plans they were carrying out.*

6877

No. 53] [1745

छ ९ मोहरम. २७ जिल्हेज

श्री.

पुरवणी श्रीमंत राजश्री पंतप्रधान
स्वामींचे सेवेसी

कृतानेक विज्ञापना. स्वामीची आज्ञापत्रें छ १६ माहे जिल्हेजी बराबर कासीदजोडी सादर जालीं तीं छ २६ मिनहूस संध्याकाळचा च्यार घटिका दिवस असतां प्रविष्ट जाली. नबाबास व खानांस थैलिया होत्या त्याहि प्रविष्ट जाल्या. आज्ञापत्रांचा अर्थ सविस्तर ध्यानांत आणून त्याच समई निघोन खानाकडे गेलों तो खान दरबारास गेले होते. तिकडून सावटिका रात्रीस डेरेयास आले तेव्हां भेट जाली. खानाची थैली रुजू केली तेच समई वाचून पाहिली. यावर नबाबाची थैली खानानी आपणाजवळ घेतली. प्रातःकाळीं यावयाची आज्ञा केली. यावर छ २७ मिनहूस प्रातःकाळी खानाकडे गेलों. खलवतामध्यें भेट घेतली. स्वामीनें सेवकास आज्ञापत्रीं आज्ञा केली तो अर्थ अक्षरशा खानास वाचून दाखऊन समजाविला, याजवरून संतोषी जाले. तेच समई मुनसीस बोलाऊन सदरहू मजकुराचा तरजुमा पारसी नबाबास समजावावयाकरितां लेहविला. बोलिले कीं, आतां दरबारास जाऊन जाबसाल करून येतों. त्याजप्रों तुम्हासहि ल्याहावयास सांगोन व आम्ही जाब लेहून देऊन. मग आज्ञा घेऊन आलों. यावर छ २८ मिनहूस प्रातःकाळीं खानाकडे जाऊन जाबाविषई विनंती करितां बोलिले कीं, काल रात्रौ नबाबास तुमची थैली गुजरानिली व आम्ही आपलें खत व तुमचे खताचा तरजुमा रुजू केला. नबाबानीं आपले हातें तपसीलवार वाचून पाहिला. खूब आहे म्हणोन बोलिले. यावर नबाब येहीं बगाजीपंत कधीं येतील म्हणौन पुसिलें. आपण जाब दिला कीं, बगाजीपंतहि लवकरीच येतील. मसलहत नबाबाचे खातिरेस आली. नबाबहि त्याच तरतुदीमधें आहेत. प्रस्तुत नबाब हिदायत मोहिदीनखानांस बाबू नायकास तंबी करावयास बराबर भारी फौज देऊन पाठवितात. मारनिलेस जरिदा व्हावयाचीताकीद जाली आहे. तुम्ही बगाजीपंतांस लवकर आणवणें म्हणौन खान बोलोन फेरोजाबादेस दरगास जावयास निघाले. सेवकानें जाबाविषई हटकिलें. यावर बोलिले कीं, दरगाहाहून आलियावर जाब लेहून देववितों व नबाबाचा जाब देववितों. नबाबहि छ मारीं दुपारची नमाज करून दरगाहास गेले आहेत. जाब यावयास दोनच्यार दिवस लागतील. स्वामीची आज्ञा कीं, कासिदांची रवानगी जलदीनें करावी, जाब मागाहून पाठवावे. याजकरितां आज्ञेप्रों कासिदांची रवानगी केली आहे.

भेटीस येणार आहे. माणूस थोर आहे. बोलतो तसें करील, असें दिसतें. याउपर स्वामी समर्थ आहेत. आदलर्ले वर्तमान विदित व्हावयाकरितां लिा आहे. हे विज्ञापना.

*¶Raghunath Ganesh reports to the Peshwa the substance of a conversation which he had with one Shambhunath Braj Bhukandas, who had arrived at the Nizam's court from Delhi on some private business. Shambhunath gives all kinds of promises and says that he would uphold the Peshwa's cause at the Emperor's Court and would secure Sanads of Gujarat for him. Though an Emperor's servant he would secretly serve the Peshwa—says he.*

---

No. 56] [1747-48

## श्रीशंकर

सालेसाल बोढणीस आणावा.

यादी बागाची गणती सुाा समान आर्बैन मया अलफ.

किता दक्षणेकडील व पश्चिमकडील बाग

१ ताईचा बाग
१ बाईचा बाग
१ धोंडोपत जोगळेकर
३ जिवाजीपताचे
२ माहादोबाचे
१ बाईचा बाग पर्वतीचे बागाजवळील
१ विसाजीपंत
१ श्रीपतराव बापूजी
१ सिदोजी राऊत
१ पुरंधरे भट
१ पाटणकर
१ चिमणाजी भीवराव याचा बाग

किता उत्तरेकडील व पूर्वेचे ३ सरकारचे बाग निा आनंदराव

१ महिपतराव
१ आयाबा
१ मल्हारजी होळकर संगम
१ सुभेदाराचा
१ राणोजी सिंदे

---

किता बाग

१ वाननर्डाचा
१ त्रिंबक रामाचा

6882

१ अंताजीपंत
१ गोविंद हरि
१ सदासिवभट दीक्षित
१ रामाजी मल्हार
१ वासदेव जोसी
१ शंकराजीपंत
१ मल्हारजी होळकर
१ सिवरामबाबा चित्राव
१ कबुतरखान्याजवळ सरका-
रचा बाग
१ बाजीभट शालग्राम
१ कोनरपंत
१ भिऊबाई

¶*A list of gardens round about Poona is given in the paper.*

---

*No. 57*] [*23-2-1748*

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री
नाना स्वामी गोसावी यांसी

पोंष्य गोविंद खंडेराव सा। दंडवत प्रा। विनंती उपरी. येथील कुशल ता। फाल्गुन शुध शष्टी मंगळवार जाणून स्वकीय कुशल लिहीत गेले पाहिजे. यानंतर आपण पत्रे पाठविली तीं पावली. लेखनार्थ अवगत जाला. सविस्तर अर्थ श्रीमंताचे पत्रावरून कळला. त्यांचे मालजाव श्रीमंतास लिहिले आहेत त्यावरून विदित होतील. सारांश हेच की त्या रदबदलीचे समई तुम्ही होनांच. मुलकाची गोष्ट श्रीमंतानी आज्ञापिली ते समई आम्हीहि जखली (!) घेतली होती तोच भावार्थ यांचा दिसतो. पैक्यावर कबूल करून येश घ्यावे, मग याचे घर. याचविल्यास शक मारून हेहि काही ऐकतील. अगोधर होता संकट आहे. मग दाभाडे याची दौलत जाणे. राज्याम आपाये होणे असे असले तरी इलाज नाहीं, परंतु ये समई श्रीमंतानी अड न धरिता साहित्य करावें हेच उचित आहे. तुम्ही प्रसंगी आहां. येथे या श्रीमंतास सांगून तिकडे श्रीमंतास लेहून पाठऊन जावसाल लौकर आणवावयाचा विचार करावाच करावा. मागाहून आम्हीहि सिधातरूप उतर पाठवितों. दोहचहू दिवसान मातुश्रीची भेटी होईल. रा।

माधवराऊ जिवाजी याची भेटी होऊन त्यास आपलेंस केलें. सारेच हाताखालें घेतले आहे. श्रीकृपें वडिलांचे आशीर्वादें उतमच होईल, परंतु नवाबाची धाड मोठी चालली आहे हे निवारण जाले तरी उतम, नाही तर दाभाडे याची भट पडो, आम्ही माणसातून जातों, याचा उपाय तुंम्ही कराल तरी उचित आहे. राजश्री केशव राऊजीस नमस्कार पावता केला. त्यांणी तुम्हांस पत्र लिहिले आहे त्यावरून कलेल. आपण सासवडास जाऊन सातारा कधी जातील ते लिहीत जावें. सातारियास गेलियावरी फड मारून न्यालच. वराता होऊ लागतील तेव्हा आमची गुंता जामदारखानेयाचा संमधी आहे तो चितात असों द्यावा. नाही तर आमचे सांबती यैवज वराताखाले नेतील. आम्ही प्रसंगी नाही तर तुम्ही धर्णा आहां. कलेल तैसे राखून वरचेवरी लिहीत जाणें. निठूर व चिरगोपे याचे बाबतीच्या सनदाविसी लिहिले तरी सनदा रावो अनंदराऊ यांजवळ आहेत ते कार्यास गेले आहित. आलियावरी पाठऊन देऊ. नाही तर दुसरिया करून देवितों. कलले पाहिजे. बहुत काये लिहिणं कृपा लोभाची वृधि करावी. दूर लांबलो म्हणून दूर न धरावें हे विनंती.

*¶Govind Khanderao Chitnis informs Nana Purandare about the difficulties in the settlement of the affair of the Dabhades and requests him to use his influence with the Peshwa to bring about a lasting settlement. The whole letter is in Govindrao Chitnis' hand*

---

*No. 58]* *[1748?*

श्रीअंबावरद

सेवेसी विज्ञापना माणिकगडचे नाव न घ्यावे म्हणजे सर्व निर्बंध करून देवितो म्हणोन आज्ञा. यैशास पूर्वापर ममता स्वामीची, पुढे संकटास पावावे, आपले ऊर्जित करावे हा अर्थ चितात आणून राजमाची, कोथला, बेरोटी, चोण नजर जालियाउपरी आंतर काडीमात्र पडणार नाही, सर्व प्रकारे आगत्य संकटास पाऊन श्वहितच करून, यास आतर नाही म्हणोन प्रसाद भाकर रोटी वेल उभयतां श्रीमंत कैलासवासीनी दिल्हा असता, तेंच कवच स्मरोन वर्तत असता पाल, मिरगड, बहिरवगड घेतला. आम्हांकडून अपराध अंतर काये पडिले ? आलीकड माणिकगड घेतला होता तो फिरोन दिल्हा असतां समर्थांनी दिल्हा टाकिला, त्याचा फिरोन आदर न करावा हेहि वचन समर्थांचेच आहे. यैसे आसोन नाव न घ्यावे, म्हणावे तरी खादेरीचा तनखा फड फर्मास राहिली यास काये करावे ? गेले तरी आम्ही तुमचेच यैसे म्हणता म्हणोन अर्चवियांत स्वामी आणितात तरी सर्व सामर्थ्य पदे

व खुद पूर्वापर वडीलपण आपणाकड आसता आम्ही स्वामीचे न म्हणोन परिणाम काये? पाया आम्ही सोडीत नाही. वरकड संदर्भ तुम्ही न धरावे म्हणोन आज्ञा तरी श्रीनी गाठी येथें घातली आसतां आन्यत्र राजकारणे ममता लाविलीयाने आमचे स्वहित काये होणे आहे? याकरितां श्रीने गाठी स्वामीसी घातली तेच परंपरेने चालवावी हेच इछा. यासी साक्ष गफतपूर्वक श्रीच आहे. याउपरी स्वामीनी दुसरा कल्प न आणिता माणिकगड प्रांतसमेत समर्थानी दिल्हा तेच प्रमाण करून स्वाधीन माणिकगड करून रवानगी करावी. पुढें सर्व प्रकारें आमचे मामलियाती(ल) किंत तोडून देऊन निखालसपणे सर्व प्रकारे चालऊन सेवा घ्यावी. याउपरी विलंब माणिकगड स्वाधीन करावया न लावावा. सध्या माणिकगट स्वाधीन करणारा स्वामी समर्थ आहेत हे विज्ञापना.

¶*The writer probably Manaji Angria assures the Peshwa of his loyalty and devotion and asks the latter's good offices for Manikgad being restored to him..*

---

No. 59] [17-6-1748

छ १५ शौवाल

श्री

श्रीमंत राजश्री पंत प्रधान स्वामी-
चे सेवेसी

सेवक केशव राम दिा कृष्णार्जी नाा भिडे व रामाजी नाईक भिडे सां नमस्कार. सेवेसी विज्ञापना येसीजे. आपनास उभयेताहि राजश्री अमृतरावजीसमागमे बंगालियास माल खरिदी करावयाबद्दल रवाना केले. येवजीहि थोडाबहुत समागमे आणिला होता. त्यास येथे यांची खर्चाची वोढ देखून असलीस साहित्य न करावे अयुक्त जाणून जे साहित्य होऊन आले ते केले. प्रस्तुत येथे रेसीम येक हजार मनपावेतो घेत आहे. त्यास येथील अधिकारी हसील महसूल मागतील म्हणोन विज्ञापना जे कृपा करून पत्रे राजश्री रावजीस व नवाबास पाठ(वा)वयाची आज्ञा केली पाहिजे, कीं सरकारात झालरीबद्दल रेसीम पाहिजे याची खरिदी करावयास केशव नाईक पाठविले आहेत. हे जो माल खरिदी करतील त्यास जकातीचा उपसर्ग न लावितां माल नावेवर घालून श्रीवारानसीस पावता होये ते करणे. येसी पत्रे आलियास सेवकावर कृपा केलीसी होईल. वहुत काये लिहिने हे विज्ञापना. अशाढ शुध ३ शुक्रवार शके १६७० विभव संवतछर.

¶*Keshavram, a clerk of Krishnaji Naik Bhide, requests the Peshwa to issue permits to the customs officials to enable him to bring silk from Bengal duty-free.*

No. 60] [10-2-1749

श्रीशंकर

तीर्थरूप राजश्री भाऊ

स्वामी वडिलाचे सेवेसी

अपत्ये रघुनाथाने चरणावरी मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल ता। छ ३ रबिलौवल मु॥ कुवटे नजीक वर्धनगड पावेतो वडिलांचे आसीर्वादेकरून सुखरूप असो. विशेष. आपणाकडून पत्र येऊन वर्तमान कलत नाही तरी ऐसे नसावे. सदैव पत्रद्वारा लेकराचा परामर्ष करीत असिले पाहिजे विशेष. काल आमचे जांबहून कूच जाहाले ते येथे आलो. राजश्रीचे तेरवाच्याच दिवसी कूच होऊन कोरेगावास आले. आमचे काल जाहाले. आज उद्या निरोप व्हावासा आहे. येथून जेजुरी कुरकुंब करून येतीलसे वाटते. राजश्री निरोप द्यावयास फार चुकावतात. सिफारीस जानात. नजर घेत नाही. फारसे जाहाले तर नजर आम्हापासी ठेऊन जातील. आम्हास महिना पंधरा दिवस रहावे लागते. राजश्रींनी सांगितले की पेशव्याच्या भावास येथे ठेवणे त्याजवरून आम्हास ठेवावयाचा करार जाहाला आहे. हजार फौज आम्हाबरावर राहील. नाना व आम्ही मुंजीस निरोप घेऊन येऊ असे आहे. आपणास कलावे म्हणोन लि॥ असे. बहुत काये लिहिणे? कृपा केली पाहिजे हे विज्ञापना.

¶*Raghunathrao writing to Bhausaheb from the camp of Shahu says that he is accompanying the King and that with his permission he will shortly return to Poona for the thread ceremony of Vishwasrao.*

---

No. 61] [March 1749?

श्री

[ पहिला बंद गहाळ. ]

२ पु॥ श्रीमंत रा। पंत प्रधान स्वामी

आम्हांस सांगाल त्या ठेऊ. आमल सुरळीत देऊ म्हणून चिमणाजी वामन यासी तह केला. दुधनेच्याच्या गड्यांचाहि तह येणेप्रमाणेच लक्ष्मण नारायेण यासी जमिदारानी केला. मुलूक कौली. याजमुळे मामलेदारांच्या मतें फौज राहिलियां पायेमालीनें मुलूक खराब होतो. याजकरितां आम्हांस म्हणो लागले की, मुलूकचा बंदोबस्त जाला आणि रोजमरियाची नेमणूक अखेर आस्विनापासून नाहीं. याजकरितां आम्हास फौज घेऊन हर कोठे गुजरान करावीसे जालें.

दूर पोट भरावयासी जावे तर सार्वभौम दिलीहून बाहेर निघाले आहेत. रोहिल्यानी बगस बुडविला यामुळे आतर्वेदीचा बदोबस्त करावा. त्यास कायेमखान बगस याची आई पातशाही लस्करात गेली. कारभारी याच्या हाते आपले मुलूकचा ठराव करावा. त्यास वजिराच्या चितास न आले. थोडा बहुत मुलूक त्यास देऊन बरकड मुलूक घेतला. काही पैका घेतला. पातशाहाच्या स्वारीचे रोख मकसुदाबाजिकडे जाऊन तिकडील खजिना आणावा आगर फरकाबादेस यावे. नाहीं तर आगऱ्यास यावे, जाटाचा वगैरे बदोबस्त करावा. दुसरे खबर कीं, भदोरे जाऊन भेटले. वीस हजार फौज घेऊन भदावर प्रातास येणार. त्याणी या प्रातास येऊन बदोबस्त करावा ऐसे वर्तमान् व बुधेल्यास सिरपाव, हती, वस्त्रे जाऊन पोहचलीं व ये प्राती देसचे वर्तमान मनमानेसे उठऊन बदा करावयासी पाहातात यामुळे आम्ही दुसरेकड न जाता फौजेनसी कछवावार प्रातीहून कूच करून ग्वालेर प्रातास आलो. फाजेच्या दहशतीनें दबा खातात. आम्ही लस्करचा मुकाम शहारर केला आहे की, कदाचित स्वारी आगऱ्याच्या रोखें आली आणि भदोऱ्यानी गुज बाधोन फौज आणिली तरी काये चिंता आहे. इकडे न आले, फरकाबादेकडे गेले तरी ते प्राती राजश्री बापूजी बाजीराऊ आहेत त्यास लिहिले आहे. ते आम्हास लिहितील आम्ही जाऊन पो (अपूर्ण).

¶*This is a fragmentary letter with both the beginning and the end missing It refers to the developments in Northern India especially pertaining to the move of the Emperor towards the Doab on the overthrow of Bangas by the Rohillas and to the manœuvres of the Jats near Agra and Bhadavar*

---

*No 62]* *[1749?*

## श्री

यादी किल तुग येथील लोक जे समई भेटले ते समई तह येणेप्रा जाला. खसैन मया अलफ रा हैबतराव व आमचे बारकरी निवटक सिरा ऐसे पनास साठ येणेप्रा समागमे किल्यास चढले व त्याचे माणूस च्याळीस पनास वरते आहे. येकूण त्याचे आमचे माणूस शभर वरते आहे बदोबस्ती किल्यावरती आमची आहे. किल्यावरून जुने लोक उतरावे तरी कविल्दार वतनदार आहेत. पुढे स्वामीकडे शेवा घेणे, याजकारणे त्याची आमची आणशफत होऊन येणेप्रा तह करून घेतला. त्याचे वरते प्रावल्यत्व कोणे गोष्टीचे नाही, ते आपले जिमे लागले. पुढे त्याचे उर्जित करणार स्वामी खावद आहेत.

¶*The capitulation of the fort of Tung and the subsequent arrangements are reported in this paper.*

No. 62A] [22-2-1750

श्री

राजश्रिया विराजित रा रा

राऊजी स्वामीचे सेवसी

सेवक श्रीपत विठ्ठल सां नमस्कार उपरी येथील क्षेम ता। छ २९ रबिलावल मो दरजागा कलसपाक व तिरणामल या मांबेनमधें जाणून श्वानंद सदेव लिहून सनाथ केले पाहिजे. यानंतर पत्रावरी पत्रे सेवेसी लिहितो, परंतु येकहि उतर येत नाहीं. आमचे वर्तमान नवाब नासरजंग खवाबाट उतरून चंदावरास मजल दरमजल कूच केलें. ज्या दिवसीं घाट उतरले त्या दिवसीं दाहा कोस मजल जाली. सूर्यअस्त जाला. दाटी फार. घाटमाथा बैल कठाळ व राहुटी सुधा गेला. येल्न फार केला परंतु कोठे त्याचा खोज न लागला सर्वा गोष्टींची विपत्य तरी येऊन घडली. बसावयास सावली नाहीं व पात्रे नाहीत. येक तां पूर्वीपासून कर्ज भारी होते. सांप्रत आणखी शंभर रुां कर्ज करून दोनी वस्त्रे व पात्रे करणे पडलें. वर्तमान या रीतीचे आहे. नासरजंग व मुसफरजंग उभयताहीं चालीस कोसाचे मफासलेने आहेत. अस भारी अरिष्ट उडवले आहे. श्री काय करितो पाहावें. विशेष काय लिहिणे हे विनंती.

¶*Shripat Vithal reports to the Peshwa the march of Nawab Nasarjang to Tanjore.*

---

No. 63] [13-3-1750?

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी

विनंती. सेवक शंकराजी केशव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता। छ १९ माहे रबिलाखरपावतो स्वामींचे कृपावलोकनेकरून सेवकाचे व येथील प्रांताचे वर्तमान येथास्थित असे विशेष. सरयेतपन्हा महमद साले सतारी सावकार बंदर मजकूर यांची गुराब व रा। सदासिव दादाजी गुमस्ते सबनीस जंजिरे शरनाळा यांची सिबाड मालसुधा राजश्री तुळाजी आंग्रे सरखेल यांचे आरमारकरी यानी धरून गुराब व सिबाड जंजिरे विजेदुर्गचे बंदरां नेली. ते मालसुधा आणावी म्हणून येथून कारकून पत्र देऊन पाठविले होते. त्यास सरकारचे कारकून तेथे जाऊन पोहचत तो त्यानी गुराबीवरील व सिबाडीवरील माल खाली करून घेतला. तांदूळ लोकास अडिसेरीस खर्च केले. वरकड माल कोठीस लाविला. कौल घेतला नाही म्हणून माल खाली करून घेतला. बादरीयाणे

लाऊन कागद येथें लिहिला आहे तोच बजिनस हुजूर पाठविला आहे. त्याचे पत्रावरून त्यांचा मनोदय अवगत होईल. स्वराज्यात सावकारी तराडियास त्याकडोन कौलाचा उपसर्ग लागल तेव्हां सावकारी कसी चालेल? आजपावत असे जाहाले नसता सांप्रत ते दुराग्रहास प्रवर्तले आहेत. मुखवचने सांगोन पाठविले आहे. सावकारांही कौलावण देत जावे. नाही तर सावकारास उपसर्ग लागल. येविसी त्यांचे पारपत्य कर्तव्य ते खुसकीने राऊत पाठऊन स्वामीने करावे. परिछिन त्यास शह पोचल्याविना मुरलित येत नाही. हुजूर त्याकडोन रा विसोपंत मंडलिक आले आहेत. त्यास निक्षूण आज्ञा केली आणि आंगरे मारतिले माल द्यावयास मान्य जाले तर माल देता घालमेल करतात. याजकरितां मालाचा पैका करून मोबदला रुपये देतील तर घ्यावे. वरकड माल देतो म्हणाले तर मालाचा हरास त्यानी केला याउपर मालाचा आकार करून रुपयेच घेता बरे. ते म्हणतील कीं मोबदला किमतीचा माल कोठीपैकी देतो तर नासका माल येका रुपयाचा ते चहू रुपयास देतील. तेण्हेकरून आपले पदरचे सावकारास तो बहुत येईल. मागे येक दोन वेला त्यानी असेच केले. परिछिन उभयेता आगरकासी तह सरकारचे बंदरची नेहमी सावकारांची तरांडी व कोलयाच्या माहागिऱ्या हरयेक बंदरी जातील येतील त्यास दर्यात कौलावणीचा वगैरे उपसर्ग न द्यावा, व सरकारचे खाडियाची नस्ते आहेत त्याजवर नागरखाडा त्यानी आपले अरमाराचा न करावा, नम्तापासून बारा कोसावर पलीकडेस दर्यात वाजिबंदरचे तरांडीयासाठी फिरणे तर त्यानी फिरावे. याप्रा जाहाले तर बंदरे चालतील, नाही तर बंदरे पडली. जकातदारास तोटे आले आहेत. आपले आरमार स्वारीस जाते आणि मागे उभयेता आगरे उपद्रव करितात. उभयेतांची पत्रे आलीं ती पाठविलीं आहेत. आपले पदरचे सावकार येणेकरून खराबीस आले व जकातदारांची दिवाली निघावयास आली आहेत. तुलाजी आंगरे उगच म्हटल्याने हे गोष्ट आईकणार नाहीत. ते म्हणतील की पुरातन आपली कौलावण आहे. तर अलीकडेस हे स्वराज्य जाले तेव्हा आपले उदम्याची कौलावण त्यास न द्यावी. याचप्रमाणे पायेडा असावा. पूर्वी शामलाचा व आगऱ्याचा तह असाच होता. परस्परे कौलावण, सावकारास कौलावण घेत नव्हते. शामल तो परकी होता. हे तो स्वराज्य. येथे परस्पराचे उदम्यावर कौलावण नसावी. त्यांस सावकारी आपले पदरची चालवणे नाही आणि दुसऱ्याचे बंदरची चालू देणे नाही, हा त्यांचा विचार. आपलीं बंदरे पनास साठ हजार रुपये आकारतात त्या येवजास मानसिक जाले, येणेकरून सरकारचे नुकसान होतें.

---

१ नुकसान. हरास = विक्री, लिलाव. २ तोटा, कमतरता.

No. 62A] [22-2-1750

श्री

राजश्रिया विराजित रा रा
राऊजी स्वामीचे सेवेसी

सेवक श्रीपत विठल सां नमस्कार उपरी येथील क्षेम ता छ २९ रबिलावल मा दरजागा कलसपाक व तिरणामल या मोबैनमर्वे जाणून श्वानंद संदेच लिहून सनाथ केले पाहिजे. यानंतर पत्रावरी पत्रे सेवेसी लिहितो, परंतु येकहि उतर येत नाहीं. आमचे वर्तमान नवाव नासरजंग खत्राघाट उतरून चंदावरास मजल दरमजल कूच केले. ज्या दिवसी घाट उतरले त्या दिवसीं दाहा कोस मजल जाली. सूर्यअस्त जाला. दाटी फार. वाटमाथा बैल कठाळ व राहुटी सुद्धा गेला. येत्न फार केला परंतु कोठे त्याचा खोज न लागला सर्वा गोष्टीची विपत्य तरी येऊन घडली. बसावयास सावली नाही व पात्रे नाहींत. येक तो पूर्वीपासून कर्ज भारी होते. सांप्रत आणखी शंभर रुा कर्ज करून दोनी वस्त्रे व पात्रें करणे पडले. वर्तमान या रीतीचे आहे. नासरजंग व मुसफरजंग उभयताही चालीस कोसाचे मफासलेने आहेत. असे भारी अरिष्ट उडवले आहे. श्री काय करितो पाहावें. विशेष काय लिहिणे हे विनंती.

¶*Shripat Vithal reports to the Peshwa the march of Nawab Nasarjang to Tanjore.*

---

No. 63] [13-3-1750?

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे सेवेसी

विनंती. सेवक शंकराजी केशव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता छ १९ माहे रबिलाखरपावतो स्वामींचे कृपावलोकनेकरून सेवकाचे व येथील प्रांताचे वर्तमान येथास्थित असे विशेष. सरयेतपन्हा महमद साले सतारी साव-कार बंदर मजकूर यांची गुराब व रा सदासिव दादाजी गुमस्ते सवर्नीस जंजिरे रत्नाळा यांची सिवाड मालमुधा राजश्री तुळाजी आंग्रे सरखेल यांचे आरमारकरी यांनी धरून गुराब व सिवाड जंजिरे विजेदुर्गचे बंदरा नेली. ते मालसुधा आणावी म्हणून येथून कारकून पत्र देऊन पाठविले होते. त्यास सरकारचे कारकून तेथे जाऊन पोहचत तो त्यांनी गुराबीवरील व सिवाडीवरील माल खाली करून घेतला. तांदूळ लोकास अडिसेरीस खर्च केले. वरकड माल कोठीस लाविला. कौल घेतला नाहीं म्हणून माल खाली करून घेतला. त्रादरीयाणे

लाऊन कागद येथें लिहिला आहे तोच वजिनस हुजूर पाठविला आहे. त्यांचे पत्रावरून त्यांचा मनोदय अवगत होईल. स्वराज्यात सावकारी तरांडियास त्याकडोन कौलाचा उपसर्ग लागल तेव्हां सावकारी कसी चालेल? आजपावेत असे जाहाले नसता सांप्रत ते दुराग्रहास प्रवर्तले आहेत. मुखवचनें सांगोन पाठविले आहे. सावकारांही कौलावण देत जावे. नाही तर सावकारास उपसर्ग लागल. येविसी त्यांचे पारपत्य कर्तव्य ते खुसर्कीने राऊत पाठऊन स्वामीने करावें. परिछिन त्यास शह पोचल्याविना मुरलित येत नाही. हुजूर त्याकडोन रा विसोपंत मंडलिक आले आहेत. त्यास निक्षूण आज्ञा केली आणि आंगरे मारिले माल द्यावयास मान्य जाले तर माल देता घालमेल करतात. याजकरितां मालाचा पैका करून मोबदला रुपये देतील तर घ्यावे. वरकड माल देतो म्हणाले तर मालाचा हरास[१] त्यानी केला याउपर मालाचा आकार करून रुपयेच घेता बरे. ते म्हणतील कीं मोबदला किमतीचा माल कोठीपैकी देतो तर नासका माल येका रुपयाचा ते चहू रुपयास देतील. तेण्हेकरून आपले पदरचे सावकारास तो बहुत येईल. मागे येक दोन वेळा त्यानी असेच केले. परिछिन उभयेता आंगरकासी तह सरकारचे बंदरची नेहमी सावकारांची तरांडी व कोल्याच्या माहागिन्या हरयेक बंदरी जातील येतील त्यास दर्यात कौलावणीचा वगैरे उपसर्ग न यावा, व सरकारचे ग्वाडियाची नस्ते आहेत त्याजवर नागरवाटा त्यानी आपले अरमाराचा न करावा, नस्तापासून बारा कोसावर पलीकडेस दर्यात वाजेबंदरचे तरांडीयासाठी फिरणे तर त्यानी फिरावे. याप्रा जाहाले तर बंदरे चालतील, नाही तर बंदरे पडली. जकातदारास तोटे[२] आले आहेत. आपले आरमार स्वारीस जाते आणि मागे उभयतां आंगरे उपद्रव करितात. उभयेतांची पत्रे आलीं ती पाठविलीं आहेत. आपले पदरचे सावकार येणेकरून खराबीस आले व जकातदारांची दिवाली निघावयास आली आहेत. तुलाजी आंगरे उगच म्हटल्याने हे गोष्ट आईकणार नाहीत. ते म्हणतील की पुरातन आपली कौलावण आहे. तर अलीकडेस हे स्वराज्य जाले तेव्हां आपले उदम्याची कौलावण त्यास न द्यावी. याचप्रमाणे पायेंडा असावा. पूर्वी शामलाचा व आंगऱ्याचा तह असाच होता. परस्परें कौलावण, सावकारास कौलावण घेत नव्हते. शामल तो परकी होता. हे तो स्वराज्य. येथे परस्पराचे उदम्यावर कौलावण नसावी. त्यांस सावकारी आपले पदरची चालवणे नाही आणि दुसऱ्याचे बंदरची चालू देणे नाही, हा त्यांचा विचार. आपलीं बंदरे पनास साठ हजार रुपये आकारतात त्या येवजास मानसिक जाले, येणेकरून सरकारचे नुकसान होतें.

---

१ नुकसान. हरास = विक्री, लिलाव. २ तोटा, कमतरता.

त्याहीं हे गोष्ट मान केली नाही तर त्यांचे पारपत्य करणार स्वाम समर्थ आहेत. पारपत्य जाहालियाविना त्यांचेहिं डोळे उघडत नाही. त्याहीमध्यें तुळाजी आंगरे यांचे मुल्कावरी निग्रह जाहाला म्हणजे राजश्री मानाजी आंगरे सहजेच आईकतील. तुळाजी आंगरे ठिकाणी न राहिले तर सरकारची बंदरे चालत नाही. विदित होये हे विज्ञापना.

¶*Shankaraji Phadke, Sarsubha of the Konkan, writing to the Peshwa, makes a strong representation against Tulaji Angria levying his own tax on trading ships. This practice of the Angria has, the writer says, ruined the coastal trade: if the trade is to be saved, Angria must be severely punished. The paper explains the original cause of friction, which ultimately determined the Peshwa to put down the Angrias.*

---

*No. 64*] [*Previous to 26-4-1750*

श्री

राजश्री भाऊसाहेब गोसावी

यासी

ॐ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्ये श्री लक्षधीर दलपतराऊ विनंती उपर. येथील कुशल जाणऊन स्वकीये निजानंदलेखन करीत आसिले पाहिजे. यानंतर साहेबाची आज्ञा घेऊन स्वार जालो ते स्वस्थली कृपायोगे सुखरूप पावलो. तो श्रीमंत राजश्री चे आज्ञापत्र आले की लग्नास यावे. त्यास सर्व प्रकारे आज्ञा प्रमाण, परंतु या देशात सांप्रत लावणीचा प्रसंगामुळे योजना करावी म्हणौन चिरंजीव सौभाग्यवती लालकुवर यासी पाठविले आहे. सर्व प्रकारे भरवसा साहेबाचा आहे. येथून मामा वदनजी शेवेसी आले आहेत. हे सविस्तर वर्तमान निवेदन करितील त्याप्रमाणे प्रत्युत्तर पाठविले पाहिजे की तदनुसार वर्तणूक करून.. बहुत काय लिहिणे. स्नेहवृधि करावी हे विनंती.

¶*Lakshdhir Dalpatrao to Sadashivrao Bhau expressing his inability to attend a marriage ceremony and saying that he is sending Lalkuwar instead.*

---

*No. 65*] [*June 1750?*

श्री

पु॥ तीर्थरूप राजश्री नाना व ता॥

राजश्री भाऊ स्वामीचे सेवेसी

विनंती आजी तिसरे प्रहरा येशवंतराऊ नागोराव विष्णुपंत दरबारास गेले होते. राजश्रीनी येशवंतरायास म्हटले कीं, कारभार काही होत नाही. लोकाचा गवगवा जाहाला आहे याची वाट करणे तर करा. नाही तर मी येका दिवसात माझा मी

बंदोबस्त करीन. कोणास भीत नाही. ब्राम्हणी काये करतात ते पाहातो. त्यावर हे त्रिवर्ग बोलले की येकांती बसावे. आम्ही आर्ज करितो तो चागला समंज्यसपणे येकावा. नाना गोविंदराव घरी बसले आहेत. त्यास आणावे, म्हणजे कामकाज चालीस लागल. येसे बोलून येकातास घेऊन त्रिवर्ग गेले. येशवंतरायानी स्वामीच्या लक्षाच्या गोष्टीवर बहुत तोडजोड सामदाम-विचार फारच चांगले राजश्रीसी बोलले. परंतु राजश्रीच्या खातरेस स्वामीचे नाव काढताच न आले. राजश्री बहुतसे ताई भरून मोठ्या कुरयाने बोलले.

पेशव्यानी संभाजी राज्याकडे रामाजीपंत पाठऊन सूत्र केले होते. गड किले मागत होते, तव्हा सभाजी राज्यानं येकिले नाही. मग माझ्या पाया पडायासी आले. मला सारे ठाऊक आहे.

मी कोठे पाया पडत होतो! मी किला येक देणार नाही. त्या काये कुणाचे घेतले आहे. येसे साफच चागले बोलले.

यमाजीपंतास मी त्यासा जाऊन हाती धरून आणीन. तो ब्राम्हण चागला आहे. तो माझा करभार करील. मी त्याला आणीन. तुम्हाला वरकडाला मिणार नाही.

आईसाहेबाला कधी आणावयासी जाणार नाही. वरीसभर कुहीजिर्वान. तिचे काम काय येथे आहे? खेली तर तीच आहे. तिला आणीत नाही. आली तर चागली कैदवार ठेवीन.

गोविंदराव येत असला, किले देत असला तर बरे. नही तर चिटनिसी दुसऱ्यास लेहून देईन. गोविंदरायाने मजवर जाच केला आहे तो मी कोठवर बोलू? काय सागू! याप्रा हे भाषण केले.

सिंहीगड देणार नाही. मोबदला येखादे टेकडे लाहानसे देईन ते घेणे तर घ्यावे. सिंहीगड देणार नाही. राजगड पाहिजे तर येथे सान्यानी यावे मग देईन.

*No. 66]* *[11-10-1750*

श्री

श्रीमंत राजेश्री पंत प्रधान स्वामी
समर्थांच्या पदांबुज्या प्रति

आज्ञाधारक कृष्णराव गोविंद दोन्ही करकमल जोडून सां नमस्कार विनंती ता। अस्विन वदी अस्टमी ब्रहस्पतवार च्यार घटका दिवस बाकी आसता विज्ञाप येसिजे. काल बुधवारी प्राथःकालापासून ते मार्तंडउदयादारभ्ये मातुश्री अंबिकाबाई व राऊ सैनापति व देवजी ताकपीर व सामाजी दाभाडे व विठलपंत मुजमदार व रेवापुरी गोसावी हे समस्तानी मसलहत केली की श्रीमंत पेशवे निस्चै गुजरात घेतात. माहादजी गोविंद याचे मारफतीने रसदा कमाविसदार माहालानी गुजरात मुकरर करून घेतल्या. श्रीमंत राजेश्री भाऊसाहेबी येमाजी सिवदेव याची ठानी घेऊन बदोबस्त करून लौकर सिदटेकास येणार. येथून श्रीमंतहि देवदरशणास जाणार. तेथे येकत्र जालिया फौजांची रवानगी होती म्हणोन निस्चये समस्तानी मिलोन केला की पचवीस हजार फौज ठेवावी, त्यामधून दाह हजार स्वार सैनाखासखेल मातुश्री आंबिकाबाईसहवर्तमान गुजरात प्रांती जावे. दाहं हजार स्वार घेऊन मातुश्री उमाबाई व सैनापतहि राजदरशण व श्रीमतासी कारभारी पाठऊन जाबसालाची भांडगड चालावी. पाच हजार स्वार तलेगावच्या जिलीयात जवलपास ठेवावे. जर काही श्रीमतानी आमची गुजरात घेता आमचे वचन मान्ये न करिता, खामखाहा गुजरातकडे फौजा रवाना केल्या, तर सोनगडीहून गाईकवाड व अंबिका फौजेसहवर्तमान येकत्र होऊन जुंज करावे. मावून पेशवे निघालिया मातुश्री व सैनापतीही पिछा करावा. गुजरात प्रांती फौजा जाऊन द्यावे. रायासी यैवज खजाना रेवापुरीने दाह लक्ष रुा देऊन केले व सेनापतीही आंबिकाबाईसी करार केला की मातुश्रीकडून पधरा लक्ष रुा देवितो. तुम्ही बाहेर डेरे देऊन दाखल होणे. हा खांपुर्शाचा करार जाल्यानंतर आज गतरात्री चंद्रउदये जालियानंतर तमाम गोटोगोट सिलेदारास जासूद पाठऊन जिनबंदी करविली, की रात्रीच पेशखानियात दाखल होत्रावे. तो त्यास सातारियाहून रेवापुरीस बोलाऊन आले, की वनसीपुरीचा काल जाला, किंवा चौ घटकानी मरनार, तुम्ही देखत पत्र श्वार होऊन येणे. म्हणोन रेवापुरीसी मसलहत करून त्यास समागमे संभर स्वार पागा व दोडसे स्वार मातुश्री ताराबाईचे धर्मपुत्र नरसिंगराऊ व कारभारी बच्याजीपंत त्याची बोली तीनशाची त्यापैकी संभर स्वार व येक हस्ती ल्याहून घेऊन आले आहेत. त्यापैकी स्वार चालीस व येशवंतराऊ बल्लाल देसपांडिया करकमकर याचे स्वार चालीस व इतर सिलेदाराचे स्वार देऊन

सातारियासी रवाना केला, तो आज स्वार होऊन गेला म्हणोन रात्रौ डेरेदाखल न जाली. त्यास आज दो प्रहरां ढाल व पेशखाना अंबिकाबाईनी मलेवाडीवर तलेगांवापासून अद कोस आहे तेथून इद्रायेनी नदी ही जवल आहे, ढाल उभी केली; त्यांस च्यार घटका दिवस बाकी राहेलीया डेरे दाखल जाली. उदईक शुक्रवारी च्यार कोस जाणार. देवजी ताकपीरास व समस्त फौजेस आज्ञा केली की ढालेपासी येऊन उतरोन. त्यास सरदारही डेरीयाजवल जातात. पहिली गणती फौजेची पधरासे काही अधिक; त्या उपरी मिवजी बंदर ५० व सुभानजी सिवदे ५० व वसतराये चक्र ६० परस्तुत आले. बोलिया तिवा जनाची दर नफर दोनसे स्वाराची आहे. नालबंदी पावलीया लोक जमा होतील. प्रस्तुत बाजरी घेऊन आठा दिवसाचा रोजमुरा दर नफरी रुा १ प्रा समस्तास दिधला. परंतु लोक बेदील नालबंदीवाचून आहेत. हे वर्तमान तर निस्चये, परंतु मातुश्री उमाबाईच्या दरबारात व बाजार अफवा तमाम गावांत की सासू सुनेसी आनबान की मातुश्रीच्या चितामध्ये की अंबिकाबाईने निराला पराक्रम न करावा. फौज न धरावी, कर्ज लोकापासून न घ्यावे, आमच्या विचारे असावे. अबिकाबाई म्हणती की हे सुस्त, याचे कारभारात जीव नाही. अखर यांसी पेशवे फजित करितात व गुजरात घेतात. आपन या समागमे खराब होऊन अबरू गमावी हे योग्य नाही. फौज ठेऊन दबावाने जे होईल बरेच होईल. सासासुनात व स्त्रीपुरुषात सलूक होत नाही, म्हणोन सून रुसोन चालली. गुजरात प्रांती वरकड वर्तमान तर बंधूजी आले नाहीत. आज प्राथःकाली यादोपंत दिवान मातुश्रीपासी आले. यानी मातुश्रीस विनंती केली मजला बंधूजी यावर श्रीमताकडे रवाना करितां, परंतु बरे वाटत नाही. पोट चोलते म्हणोन जाणे होणार नाही. बालोबा सनवई जामदारखनीयाचा कारकून सांप्रत कारभारी, तो म्हणतो की आपनास बोलता जावसाल करता येत नाही. आपन जात नाही. आपाजी गणेशाची व मातुश्रीसी काही बोली कर्जावामास जाली म्हणोन ते रुसोन डेरा घेऊन गावाबाहेर राहिले. येसे वर्तमान. हे कारकून मंडलीची मरजी घेतली. कलो आले की आम्ही श्रीमंतापासी जाऊन काये जावसाल करावा. तथापि जर कांहीं तेथे गेलियावर काही तहरह जाला पाहिजे, त्यास याचे घरी फुट, येकाची गोस्ट व विचार कोन्हाचे चितास येत नाही. मग तेथे गेलिया फजित पडावे म्हणोन मल्हार गोविंदाचा मार्ग लक्षितेत की ते तुलजापुराहून आलिया त्यास रवाना करावे. परंतु बंधुजी आलियावर कोनती तजवीज मुकरर ते पाहवी. येथे कितेक सिलेदार आहे त्याचा मनोदय की श्रीमताची नौकरी करावी यांसी पाच लक्ष रुपये ज्याजती खर्च

\+ चावते (?) = दुखते.

केलिया, परस्तुत अंबिकाबाईच्या फौजेचा व कूल दाभाडीयाचे फौजेचा जमाव उठतो. येथून लोक आज उठोन सेवेसी येतात. यासी येवज देवापुरी गोसावी सातारीयासी येवज अनायासी गेला आहे, तो गुप्तरूपे येवज घेऊन येणार. याजपासून घेऊन त्याजला रेवातीरास तपस्चर्येस पाठवावे. मातुश्री उमाबाईचा गांव खानदेशात कलमसर आहे त्यास मल्हारजी होळकराने मोरचे लाविले तेथे काही येवज मातुश्रीचा आहे म्हणोन मातुश्री कस्टी आहे. दुसर वर्तमान मातुश्रीपासी कोन्ही सागितलें की मल्हारजी होलकर भोडगावास लागला. लक्ष्मपुरापासीं पाच लक्ष रुपये मागतात. हे येकून बहुत गडबडू अंबिकाबाईस रवाना केले. जानोजी माहाराव निंबाळकर यासी नवाब नासरजगानी ज्ञानमठी ठेविले. त्यावर इतराजी फार. मोरोपतान कुफराना केला येसे वर्तमान रामराय दिवान पाढरी याचा त्याचा पुत्र श्रीनिवासराऊ त्याने सागितले हो विज्ञात. रा मल्हारजी होळकराने भोडगावास पीडा केली म्हणोन किंवा काये त्यास सुचले म्हणोन येकटा येक कूच करून मजल दरमजल अंबिकाबाई जाणार. श्रीमतांनी फौजेची आपनाजवळ करावी. लोकास ताकीद सावधतेची केली पाहिजे. येथला मनोदये विपरीत आहेत, तहावर नाही. हेही सावध जाली व दमाजीनीं सात हजारा स्वार नालबंदी दिधली हे विज्ञात.

¶*This is a news-letter from Krishnarao Govind to the Peshwa reporting the deliberations and plans formed by Ambikabai and Umabai Dabhade against the Peshwa, to prevent the latter from taking possession of the half share of the Province of Gujarat.*

---

*No. 67*] [*September 1750*

श्री

पुरवणी श्रीमंत राजश्री पंत
प्रधान स्वामीचे सेवेसी

विनंती श्रीमंत राजश्री भाऊ स्वामींनी पुसेसांवळी येथोन मुकामाहून पत्रे पाठविले तेथे आज्ञा केली कीं, राजश्री प्रतिनिधि नवरात्राच्या उत्साह करीत असतात सांप्रत ते दिवस आले याकारितां त्यास पुसोन सांगतील त्याप्रो साहित्य हजार दोन हजार रो लागले तरी लाऊन करून देणे म्हणोन लिहिले होते. त्यावरून राजश्री प्रतिनिधीस विनंती केली कीं, नवरात्राचे उत्साहाचे साहित्याची आज्ञा करावी त्याप्रो करून देऊ. त्यास त्याणी आज्ञा केली कीं, देवाच्या मुहूर्ती थोर आहेत त्या तेथेच राहिल्या, याकरितां उत्साह करावयाचे प्रयोजन नाहीं. येखादा दुसरा

ब्राम्हण सप्तशतीचे जपास घालून उपास मात्र करूं यांप्रा आज्ञा केली. सेवेसी विदित व्हावें म्हणोन लिहिले असे. प्रतिनिधि राहिले आहेत, त्या घरांत त्याजकडील लोकास व आम्हास वसावयासी अडचणच होते व चौकीच्या लोकास वसावयासी जागा नाही. यास्तव स्वामींनी येक डेरा कनानासमेत पाठविलिया वसावयाची व चौकीच्या लोकांची बेगमी होईल. सेवेसी श्रुत जाले पाहिजे. आंबेमोहराच्या तादुळावरी प्रतिनिधींची भक्ती आहे तरी तादूळ आंबेमोहराचे कैली ८२ दोन मण पाठवावयास आज्ञा केली पाहिजे हे विनंती.

¶*Shripatrao Bapuji informs the Peshwa that the Pratinidhi who was in confinement did not wish to celebrate the Navaratra ceremony as usual. He would observe a fast and finish the fixture.*

---

*No. 68]* *[1750*

श्री

श्रीमंत माहाराज राजश्री
नानासाहेबाचे सेवेसी

ℐ श्रीमंत अखंडितलक्ष्मीआलंकृत सदा राजमान्ये स्नो लक्षेधीरजी दलपती राऊ प्रांत पेठ दंडवत विनती उपरि. येथील कुशल जाणोन स्वानंद-लेखण आज्ञा केली पाहिजे. यानंतर कृपा करून आज्ञापत्र सादर केले की लग्नास येणे. त्यास आज्ञेस अवज्ञा नाही, परंतु सांप्रतच सेवेहून आज्ञा घेऊन आलो होतो. दिवस लावणीचे याप्रांताचे हेच आहेत. निमित्ये आज्ञेप्रमाणे मुलीस सेवेसी पा आहे पावतील. आम्ही पदरचे आहो. सर्व प्रकारे पदरी पडलो आहो. लज्या माहाराजास आहे. आमचा जैसा अभिमान चित्ती धरिला आहे तैसा अभिमान सेवटास लाविला पाहिजे व सेवेसी मामा बधनजी मुर्लीवरावर पा आहेत हे व रा आत्माजी बाबूराये आमचे सविस्तर वर्तमान घरकुल्याचे व कुरूंदवडील व इतर येक वर्तमान आहे ते सर्व विनती करितील ते श्रवण करून उत्तर पा पाहिजे, त्याप्रमाणे वर्तनूक केली जाईल. विशेश कार्य लिा हे विनंती.

No. 69] [1750

## श्रीभार्गवराम

श्रीमंत तीर्थस्वरूप राजश्री
नाना स्वामीचे सेवेसी

आपत्ये समान जगनाथ चिमणाजी मो धावडसी कृा सा ना वि॥ येथील क्षेम ता॥ छ २ रमजानपर्यंत स्वामीचे कृपेकडोन क्षेम असे विशेष. स्वामीने पेशजी पत्रे पाठविली ते प्रविष्टकाली बहुत समाधान जाहाले. सदैव पत्रीं कृपा करावयासी स्वामी समर्थ आहेत. श्रीच्या पुण्यतिथीच्या मोहोच्छाहास प्रारंभ आजी च्यार दिवस जाहाला आहे. वार्शिक प्रा॥ ब्राम्हणसंतर्पण व हरदास गोसावी आले. हरिकिर्तनहि होत आहे. नवदिवस अन्नशांत होईल. थोडेबहुत पीठमीठ केले ते खर्च करूं, परंतु बिदाईचे संकट पडिले आहे. समय तो रक्षिला पाहिजे. राजश्री विष्णुपंत अद्यापि काही अनकूल करीत नाही. नूतन कागदपत्र व खतें मनास येईल तैसीं करून श्रीच्या यैवजाचा अभिलास करणार. इमारत तो पडिलीच आहे. राजश्री रघोजी भोसले याचा आमचा संबंध नसता व विष्णुपताचा व आमचा संकेतहि आजीपर्यंत रघोजीचे नावाचा नाही यैसे असोन काल साताराचे मुकामी आपले नावाचे खत रघोजीचे होते ते आमचे नावाचे करून घेऊन आपणाजवल ठेविले. मागले मितीचे खत क्रित्रिम केले आहे. कोणाचे यैकोन निकालावर यावे यैसे त्यांचे चितात नाही. जाले वर्तमान सेवेसी लिहिले आहे. विस्तारे किती ल्याहावे. सेवेसी श्रृत होये हे विज्ञापना. रा॥ नानास व रा॥ गोविंदराऊ यांसी येविसी पत्र देवावयाची आज्ञा केली पाहिजे. सेवेसी श्रृत होये हे विज्ञापना.

¶*Jagannath Chimnaji ruquests the Peshwa for help in celebrating the day of the anniversary of the Swami of Dhavadshi. There is towards the end of the letter, a complaint against Raghoji Bhonsle and Vishnupant regarding a document.*

---

No. 70] [26-3-1751

## ॥ श्रीविठलराज प्रसन ॥

श्रीमंत माहाराजधिराज गोब्राम्हण-
प्रतिपाळक राजेश्री स्वामीचे सेवेसी

आज्ञाधारक नारायेण तुकदेव सा॥ ना॥ विनंति उपर येथील क्षेम ता॥ छ ९ जमादिलावल स्वामीचे प्रतापे येथास्थित असे. यानंतर काल छ ८ रोजी संध्याकाळीं रा॥ तुबाजीपंत व रा॥ केशोराव व रा॥ विठलपंत अले. रा॥ भुजंगराव पुढे इस्तकबल पाठऊन डेरियात दाखल केले. मग प्रहर रात्री रा॥ मुराररायाची

भेट जाली. परस्पर स्नेहाची उतरे बोलून उदईक मसलहत मोकरर करून स्वामीचे सेवेसी पत्र लिा येस ठहरावल. मग अज दीढ प्रहरपावेतो आपले जागा द्दष्ट विचार करून रा तुबाजीपंतास व आम्हास बोलाऊन सांगितल की आम्हास श्रीमंताची भेटी घेण हेच मुख्यार्थ आहे. आपण पत्र लिहितो. तुम्हीहि लिा त्यास गुरुवारी येथून कूच करून येतील. पौर्निमा किंवा प्रतिपदेस भेटी घ्यावी हा निश्चेय जाला. त्यानी वीस श्वार आपले पत्र देऊन पाठविले असेत. आता काही अनमान दिसत नाही. श्रुत जाल पाहिजे वहुत काय लिा हे विनंति.

¶*Narayan Tukdev informs the Peshwa that Murarrao Ghorpade had agreed to proceed on his march to meet the Peshwa*

---

*No. 71]* *[30-3-1751*

**॥ श्रीविठलराज प्रसन ॥**

श्रीमंत माहाराजधिराज गौब्राम्हण-
प्रतिपालक राजेश्री स्वामीचे सेवेसी

आज्ञाधारक नारायेण तुकदेव सा नमस्कार विनंति उपर. येथील क्षेम ता छ १२ जमादिलावल मुकाम कृष्णातीर स्वामीचे प्रतापे येथास्थित असे. यानंतर काल तिसरा प्रहरा सांडनीश्वार अले तेथ आज्ञा की रा मुराररायाम येत असतील तर सत्वर घेऊन येण. त्याच जाब तेच समई लिहून जासुदाबराबर सेवेसी पाठविला. पावली असेल. अज प्राथकाली यानी कूच करून कृष्णातीरावर अले. याजला स्वामी दरशणाचीच इच्छा अहे. हे म्हणतात की सैन्याची वाट तो कृष्णातीरच अहे. समीप लशकर अलं म्हणजे अनिकहि पाच कोस येऊन भेटी घेऊ. याहीवर जैसी आज्ञा होईल तैस केल जाईल. विशेष काये लिा. येथून काडल्हर संगम दीढ कोस असे. हे विज्ञाप्ति. छ. मारी तिसरा प्रहरा सांडनीश्वार रा वजारतमाब्रानी रवाना केले. श्रुत जाल पाहिजे हे विज्ञाप्ति.

¶*Narayan Tukdev whom the Peshwa had despatched to bring Murarrao Ghorpade writes to inform him that Ghorpade was ready to join the Peshwa as soon as he drew near. As the Peshwa had to return suddenly to Poona owing to Damaji Gaikwad's rebellion, Ghorpade does not seem to have met the Peshwa at this time.*

---

*No. 72]* *[29-3-1751*

**॥ श्रीविठलराज प्रसन ॥**

श्रीमंत माहाराजधिराज गोब्राम्हण-
प्रतिपालक राजेश्री स्वामीचे सेवेसी

अज्ञाधारक नारायेण तुकदेव सा ना विनंति उपर. येथील क्षेम ता छ ११ माहे जमादिलावल मुकाम देवरसुगर येथून कृष्णातीर दोन कोस स्वामीचे प्रताप

येथास्थित असे. यानंतर कृपा करून दयापत्र पाठविले ते सांडणीश्वाराबराबर तिसरा प्रहरा छ मा[री] पावले. परम समाधान जाले. रा मुराररायास भेटीस सत्वर घेऊन येणे म्हणोन आज्ञा त्यास रो तुक्राजीपंत व रा केशेराव अले. त्यानी सांगितले की स्वामीच येण काडलरसंगमाकडे होत आहे म्हणोन रो मुराररायास घेऊन या स्रखे आलो. त्यास लशकर तो दूर राहिल. त्यास यांचा हेत कीं आपण तीन कूच करून आलो. स्वामीनीहि येकदोन कूच करून यावं. त्यास हे उदईक शेनवारी कृष्णातीरास येतातीं. स्वामी समिप आल्यानं अनिकहि च्यार पाच कोस येतील. मुरारराव तो म्हणतातीं की अपण येथवर अलो अता पुढे अमच येण कसं होतं. परंतु त्याचे मुतसदी त्याचे रूबरूच म्हणतातीं की अनिकहि पाच कोस पुढे कृष्णेचे तीरानच येऊ, परंतु स्वामीनी येकदोन कूच करून अलं पाहिजे. मूळ हे अता भेटीस निश्चयात्मक येतातीं. काही अनमान नाही श्रुत जाले पाहिजे. बहुत काये लिा हे विज्ञप्ति.

¶*Narayan Tukdev informs the Peshwa that Murarrao Ghorpade had proceeded a few marches to meet the Peshwa.*

---

*No. 73]* *[28-3-1751*

**॥ श्रीविठलराजप्रसन ॥**

श्रीमंत माहाराजधिराज
गौब्राम्हणप्रतिपालक राजेश्री
स्वामीचे सेवेसी

अज्ञाधारक नारायेण तुकदेव साा नाा विनंति उपरी. येथील क्षेम ताा छ ११ जमादिलावल स्वामीचे प्रताप येथास्थित असे. अज गुरुवारी रो वजारतमाब यानी कूच करून रायेचुराजवळ उतरतील. अइतवारी दरशण घेणार असेत. श्रुत जाले पाहिजे बहुत काये लिा हे विनंति.

¶*Narayan Tukdev informs the Peshwa that Murarrao Ghorpade was proceeding towards Raichur to meet the Peshwa.*

---

*No. 74]* *[1751 ?*

**श्री**

श्रीमंत माहाराज राजश्री नाना-
साहेब साहेबांचे शेवेसी

␥ श्रीसकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्री लक्षधीर दळपतीराव प्रांन पेठ दंडवत विनंति. येथील कुशल जाणोन स्वकीये

6898

कुशल स्वानंदलेखनाज्ञा केली पाहिजे. आमचे वर्तमान माहाराजाचे कृपादृष्टीकरून येथास्थित असे विशेष. बहुत दिवस माहाराजाकडील संतोषावृत कळले नव्हते त्यावरून चितास परम उदासीनता होती. त्यास रा धनजी मामा व चिरंजीव करामतजी यांचे पत्र आलें की माहाराज सेनासहवर्तमान सातारियास आले. त्यावरून परम आल्हाद जाला. यैसियास येंदा सेवेसीं आपणच यावे यैसा बेत होता, परंतु शरीरीं सावकाश नव्हते याजकरितां रा मामांस व चिरंजिवास पाठविले. त्याजवर पूर्ण कृपा ठेऊन सर्व प्रकारे गौर केला म्हणून त्याणी आम्हास लिहिले. त्यास आम्ही तर सर्वस्वे आपले कृपांकित म्हणवितो. दुसरा अर्थ नाहीं, आमचे सर्व पदार्थे चालविणे संकट माहाराजास आहे. साद्यंत वर्तमान रा मामा व चिरंजीवाचे पत्रीं लिहिले आहे. सेवेसी निवेदन करितील त्यावरून श्रुत होईल. माहाराजांची स्वारी त्या प्रांती गेलियावर कुसाजी देसमुख याणे फारसा उपद्रव केला, येविसी त्यास आज्ञापत्र सादर केले पाहिजे. यानंतर येंदा जेष्टमासी आपले लग्न कर्तव्य आहे व चिरंजिवाच्या सुनता करणे त्यास सुनतांचे, साहित्य पूर्वीच करून पाठविले आहे. लग्नांचे साहित्य करणार आपण समर्थ आहेत. कृपालु होऊन बेगमी केली पाहिजे. सारांष आम्हास माहाराजांचे चरणाविरहित आश्रये दुसरा आहे नाही हें आपण जाणतात. विशेष काये ल्याहावे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

*¶Lakshdhir Dalpatrao—the father-in-law of Samsher-Bahadar expresses to the Peshwa his gratefulness for the help and kind attention. He solicits the Peshwa's help for the incision ceremony of his son. The genealogy of this ruling family of Penth as given in the Gazetteer of the Nasik District is given below and can be usefully consulted :—*



No. 75] [28-4-1752

पो छ २४ जमादिलाखर

श्री

श्रीमंत माहाराजधिराज गौब्राम्हण-
प्रतिपालक अखंडितप्रतापवंत
अवतारपुरुष राजमान्ये राजश्री
भाऊसाहेबाचे सेवेसी

आज्ञांकित राजे विरजनाथ दास बाहादूर सा। दंडवत विनंति उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लेखनार्थ विपो लेखकास आज्ञा केली पा। विशेष. अपली तीन कृपापत्रे लस्करांत येजमानापासी पावली, परंतु सेवक येजमानापासी पावला नवता. सबब की सिधटेकचे मुकामीहून श्रीमंत थोरले साहेबाची आज्ञा घेऊन पंढरपुरास आलो, तो उदाजी चव्हाण दोहजारा फौज सवे आले. यास्तव दाहापंधरा मुकाम करून हजार पाचसे लोक ठेऊन विज्यापुरास आलो. वर्तमान यैकिले की नवाबसाहेब अदवणीहून रायेचुरास येऊन कलबरगियाकडे गेले. हें वर्तमान यैकोन मीहि विज्यापुरीहून चालिलो. ते फिरत फिरत आलंदचे मुकामी छ २० रोजी मुलाजमत केली. सविस्तर वर्तमान श्रीमंताही जो करार करून सेवकास आज्ञा * * * * * ते त्याप्रमाणे समजाऊन सांगितले. सेवक येजमानापासी पावला नवता, म्हणून बंधूकडे जावयाचा उद्योग केला होता. तो मनसुबा फिरऊन धारूरचा मार्ग सोडून कल्याणचा मार्ग धरिला. तेथे मुकाम करून आपले उतराची प्रतीक्षा करतील. जैसी आपली आज्ञा येईल तदनुसार वर्तणूक केली जाईल. विष्णुपंतास सेवेसी पाठविले आहेत मागाहून पावतील. सविस्तर मुखवचने विनंती करतील ते मान्ये करून येजमानास समाधानाचे पत्र व वस्त्रें वहुमानसहीत पाठविली पाहिजेत. सेवक माहाराजाचे आज्ञेविरहित नाही. आपले पदरचा माणून निरंतर कृपा करीत असिले पाहिजे. येथें ऐकिलियांत आले कीं आमचे नवाबसाहेबाकडेहि काही सैन्य पा * * * * हे तर त्याचें काही कारण नाही. इकडून दुसरा प्रकार कोणेहि प्रकारे नाही. पाठविल्या लोकास हजूर बोलाऊन घेतले पाहिजे. विशेष काये लिहिणे हे विनंति.

*¶Raja Brijanath informs Bhausaheb that according to the instructions from the Peshwa he had gone to Pandharpur where he was detained for a fortnight owing to the rising of Udaji Chavan. The writer then proceeded to Aland and interviewed the Nizam.*

No. 76] [30-9-1752

पो छ २१ जिलकाद सुा
सह्लास खमसैन मया अलफ

श्री

सेवेसी विज्ञापना ताा छ २० जिलकादपर्यंत साहेबांचे कृपादृष्टीकरून सेवकाचे व हुजरातीचे वर्तमान येथास्थित असे. राजेश्री कान्होजी मोहिते यांचा आमचा कजिया जाला ते पत्र तपसीलवार सेवेसी लिहिले त्यावरून श्रुत जालेच असेल. आजी त्यानी पत्र पाठविले होते की तुम्ही जुजास तयार होणे म्हणून पत्र आले. ऐसियास परवांचे दिवसी घोडियाखाली आले होते तेव्हाच दाटी करून धरावे, परंतु लोक अनिवार याकरितां मागे सरून त्यास वाट दिली. ऐसे असतां त्यानी पत्र पाठविले तो मार सेवेसी लिहिला, येविशी आज्ञा करणे ते उदईक सूर्योदयापूर्वी पावली पाहिजे. त्या आज्ञेप्रा वर्तणूक केली जाईल. सरकारचे लोक जखमी जाले त्याकरितां फकीर महमद तबीब उदईक दो प्रहरा पोहोचे ते करावे आणि लोकास पोटास नाही, व जखम सेकावयासी पैसा नाही, यामुले सेवकाची गति बरी नाही, याकरिता एक आज्ञापत्र * * * * * * गीचे गाऊ आहेत त्यापैकी येवज देविला पाहिजे, म्हणजे लोकाची दिलबरी होऊन कामकाज साहेब-सेवेसी होईल. सरकारच्या पोत्यापैकी चिठ्या आल्या आहेत त्याप्रो ऐवज लोकास पाठवावा. येथे खर्चाची बहुत ओढ आहे याकरितां सेवेसी विनंती लि(हिली) ती उदास न करोन सेवकाचा व हुजरातीचा परामृश करणार साहेब समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

*¶The writer refers to a scuffle between him and Kanhoji Mohite in which the latter was almost captured but was let off owing to the large number of followers with him. He also asks for more money.*

---

No. 77] [3-10-1752

श्रीमंत माहाराज
राजश्री नानासाहेबाचे सेवेसी

ॐ श्रीमंत अखंडितलक्ष्मीआलंकृत सदा राजमान्य श्री करामतजी दंडवत विनंति उपरी. भाद्रपद वद्य ११ मंगलवारी माहाराज साहेबास वैकुंठवास जाला. ईस्वरे मोठा घात केला. आता सर्व प्रकारे माहाराजाचे पदरी पडलो आहो. आमचे चालवने माहाराजास आहे. सर्व लज्जा माहाराजास आहे. सविस्तर वर्तमान सेवेसी आलियावर विनंती करणे ते करू. माहाराजास

6901

वर्तमान कळावे म्हणोन लिहिले आसे. आमचेविशई पत्र येक रा बहिर्जी बलकवडे यास व येक रा त्रिंबक सूर्याजी यास द्यावी व येक रा विठल सिवदेव यास व येक रा हरि कृष्ण यास येसी पत्रे द्यावी की हरयेकविशई आमचे साहित्य करतील. आता आम्हास सर्व आश्रा माहाराजाचे पाये याचा आहे. बहुत काये लिहिणे हे विनंति.

*¶Karamatji informs the Peshwa Nanasaheb of the death probably of the writer's father Lakshadhir Dalapatraj and requests him to continue the same favour thereafter towards the writer.*

---

*No. 78]* *[6-12-1752*

श्री

श्रीमत सकलगुणालंकरण अखंडित-
येस्वर्यसंपन्न राजमान्य राजश्री
पंत प्रधान स्वामीचे सेवेसी

सेवक कृष्णाजी भास्कर गुरकार सवस्थान सोंधा कृतानेक सास्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल आंगिर संवछर मार्गसीर सुध प्रतिपदा ता कुशल असो. स्वामीनी आपणाकडील स्वानंदवैभवलेखनआज्ञा केली पाहिजे. यानंतर संस्थानास थैली व आम्हांस पत्र प्रेषिले पावोन आनंदोत्सव जाहाला. लेखन केले जे, फिरंगीयाणे संस्थानच्या प्रांतास उपसर्ग लाविला आहे म्हणोन परस्पर विदित जाहाले. येसियास संस्थानचा व फिरंगीयाचा घरोबा चालत असतां प्रस्तुत त्याणें येसी वर्तणूक करावयास कारण काये ? जर पूर्वरीतीप्रमाणे वर्तणूक करील तर उत्तम; नहून वेमानीच आरंभिलिया खबरदार असोन इकडेहि सूचना करणे; त्यासारिखे साहित्य उपराळा केला जाईल म्हणौन आज्ञा केली. तर संस्थानचा व फिरंगीयाचा घरोबा चालत होता. परत आज दाहाबारा वर्षामध्ये फिरंगी बलवंत होऊन राजश्री सांवताचा प्रांत हस्तगत करून, देवब्राम्हणाचा उत्सेद करून पांच वर्षे अनभविली. त्यास सजा पावला नाही. तेव्हां संस्थानच्या स्थळाची इछा होऊन निमित्य लाविले जे, इंग्रेज कडवाड बंदरास राहातां नये. त्यांस बाहीर घालावे म्हणौन. त्यास इंग्रेजाची वखार कडवाड बंदरास संस्थानाहून दिली म्हणावयाची नाही. आदलशाई, मोगलाई व सिवशाईपासून कडवाड बंदरी वखार असोन सावकारी करीत आले होते. त्याचप्रमाणें संस्थानातूनहि त्यास चालविलें साठ पांसष्ट वर्षे होतें. सांप्रत दाहापंधरा वर्षी उदीम-व्यवसाये होत नाहीं, याकरिता मुतालिकास ठेऊन मुंबैस गेले. सांप्रत दोन वर्षे

१ नाहीतर.

कडवाड बंदरास आले. सावकारी करीत आहेत. नहून नूतन त्यांस आग्रून ठेविले ऐसे नसतां उगेच त्याचे निमित्य करून संस्थानावर अतिशये आरंभून कडवाड बंदर घेऊन इंग्रेजासहि जाणें म्हणोन लाविले आहे व देवब्राम्हणाचाहि उछेद आरंभिला आहे; व वसईकडील आज दोन वर्षे धरून त्या उद्योगावरहि आहेत; याप्रमाणे धिगाई आरंभिली आहे. तेव्हा त्यांचा विनाशकाल समीप प्राप्त जाहाल्याकरितां ऐश्या वासना जाहल्या आहेत. त्यास संस्थानावर अतिशये आरंभिली याची खबर परस्पर ऐकोन तद्विपई संस्थानास पत्रे प्रेपिलीं व तद्विपई साहित्य उपराला करीत आहो म्हणोन वज्रलेप वचन प्रेपिले. तेव्हां फिरंगियाचा लये होऊन देवब्राम्हणाची स्थापना होऊन हिंदु धर्म राखिला ऐसा कृतनिश्चयें मानिलाच. स्वामी देवब्राम्हणप्रतिपालक व साभिमानी, ईश्वरांश, दैत्यांशविनाशक, स्वधर्मपालक व तद्विपई धर्मसंस्थानास वचन दिल्याप्रमाणे नसराणियास सीघ्र नशीयेत होऊन सत्धर्म संस्थानाचे कल्याण व देवब्राम्हणाची स्थापना होये आणि स्वप्रतिज्ञा पाळण कराव्यास सर्वज्ञ आहेत, याविसी संस्थानातून थैली पाठविली आहे, त्यावरून स्वांतास येईल, व उपरालेविसीं राजश्री पांडुरंग विश्राम व सिवाजी विश्राम यांस लिहीत जाणें, ते साहित्य पुरवितील म्हणौन प्रेपिले; तेव्हां श्रीमंत ज्यास आज्ञा करतील त्यासच संस्थानांहून जाणवितील. तदनुसार त्यासहि लिहिले आहे. तेहि विज्ञापना जाणवितील त्यावरून स्वांतास येईल. पूर्वीपासून वडिलांवडिलानीं संस्थानचा अभिमान धरून कित्येक प्रकारे चालविले आहे. त्याहून संस्थानचा अभिमान स्वामीनीं विशेप धरून वचन दिले आहे; तदनुसार संस्थानचे कल्याण होऊन, टोपीकार सजा पावोन देवब्राम्हणाची स्थापना होऊन श्रीमंताची प्रतिज्ञा सिधीस जाऊन आचंद्रार्क त्रैलोक्यात कीर्ति विस्तार होये ते करणार समर्थ सिखामणी आहेत. तेव्हां अधुना विशेप कार्ये लिहावें. कृपा पूर्ण असावी.

¶*Krishnaji Bhaskar is grateful to the Peshwa for his promise of help to the Sonda chief against the Portuguese aggression on the state This affair of the Portuguese persecutions on the Malabar Coast has not been much known in current history.*

---

*No. 79*] [*January 1753*

मसुदा

श्री

राजश्री तुलाजी आंगरे सरखेल

गोसावी यासीं

सकलगुणालंकरण अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्री बाळाजी बाजीराव प्रधान आसीर्वाद विनंती उपरी: येथील कुशल जाणौन स्वकीये

6903

कुशल लेखन केलें पाहिजे. यानंतर राजश्री भगवंतराव पंडित अमात्य याचा किला वावडा त्याचा तनखा खेडी व वतने खारेपाटण माहालचे सरदेशमुखी व साळसी माहालचे सरदेशमुखी व वतनी गाव आहेत तेथील ऐवज सुधामतप्रो पावावा. त्यास तुम्हाकडील उपद्रव लागतो. वतने व इनाम गाव तुम्ही आपणाकडे ठेविली आहेत. किल्याचे तनख्याचे गावास उपद्रव करितां. प्रस्तुत किल्याखालील गावीं स्वारी पाठऊन लांकडे सागवानी तोडवितां, रयतेस धास्त निर्माण जाहाली आहे म्हणोन कळो आले. ऐसियांसी तुमच्या वडिलीं राजश्री पंत आमात्य-यासीं निष्टेनेच वर्तणूक केली. हरयेकविसीं ममता धरून स्नेहभाव चालविला त्याप्रा तुम्ही घरोबा चालविल्याने उत्तम आहे. प्रस्तुत राजश्री भगवंतराऊ अमात्य श्रीमंत माहाराजासंनिध आहेत. त्यांचे सर्वप्रकारें आवश्यक आहे. आम्हासहि त्यांच्या साहित्याविसीं अगत्य जाणोन हे पत्र तुम्हांस लि॥ आहे; तरी यांच्या जिल्ह्यामध्यें किल्याचे गांव व इनामगांव व वतनें पूर्वी चालत आली आहेत, त्याप्रा चालोन, तुमचा यांचा स्नेह चाले ते गोष्टी केली पाहिजे. वडिलार्जित स्नेहाभिवृध केल्याने उचित असे. पुनरोक्त येविसींचा लेख न होये; आणि तुमचा यांचा स्नेह चाले तो अर्थ केला पाहिजे.

¶*The Peshwa censures the unfriendly attitude of Tulaji Angria towards Bhagwantrao Amatya and requests that the cordial relations which subsisted between his father and the Amatya should be continued for their mutual good.*

---

*No. 80]* *[15-4-1753*

श्री

श्रीमंत राजश्री नाना स्वामी-
चे सेवेसी

आज्ञाधारक विसाजी नारयेण चरणावर मस्तक देऊन सां नमस्कार विनंती. येथील क्षेम ता॥ चैत्र शुध त्रयोदसी रविवार मुकाम यादवाड येथे स्वामीच्या तपेतेजेकरून सुखरूप आसो. यानंतर येक दोन पत्रे लिहिली त्याचा जाबसाल लिहिलेप्रमाणे आला नाहीं म्हणोन रा॥ भिमापा देसाई परम दिलगीर आहेत. तर खासी स्वारी सवणूर प्रंती आली हे यैकोन परम उल्हस जाहाला. या लोकांस स्वारी फिरून येईल हा भरवसा नवता, परंतु आपले आनुष्टानाचे सामर्थ विशेष तेणेकड्डू सर्वाची मुखे शामवर्ण जाली. मजल दरमजल लस्कर देसास चालले यैसे वर्तमान यैकोन देसाई परम श्रमी आहेत कीं, आमचा जाबसाल व बोल सुटली नाहीं. आम्ही याचक वृतीने आठ महिने वाट पाहातो. यैसियास आपण

सवणुरावर येणे जाहाले तर सवणूरकरास हटकून तिसा हजाराचा निशा करून बोल सवजतीसें देसाई याजकडे आहे तर सवणूरकराचे पत्र नवलगुदकरास आले म्हणजे बोलीची (ची) मुक्तता होईल. रा। भिमापा देसाई यांनी भेटीस कोठे यावे ते पत्री लिहिले म्हणजे त्यासारिखे तरतूद करून येतील. रा। रामचद्र आणाजीनी नाजूक कार्याविशीं जाऊन सवजतीस वैसले होते. पाडवा यादवाडाहून मनोलीस गे(ले). सिंदे याचा निरोप व पत्रें घेऊन रा। विठल विश्राम फडजे-सहवर्तमान आम्ही येकोन सामोरे जातेसमई सवजतीस गेले रा। रामचद्र आणजीची व त्याची भेटी जाहाली, तेसमई नाजूक कार्याचा मनसबा सर्वहि त्यास सागितला. तेव्हा त्यानी सर्व गोष्टीचा भरवसा देऊन फिरोन मनोलीस आले. सिंदे यांस नानाप्रकारे सागोन सिदे व रा। देवजी मोहिते व च्यार पाचसें रा। रामचद्रपताचे प्यादे हजार ऐसे घेऊन निघाले ते नाजूक कार्याचे ठिकाणास गेले. तो सूर्यउदय जाहला कार्य नासले. याचा विस्तार अगोधर पत्र लिहिले आहे त्याजवरून कळेल आपणास पत्र पतानीं लिहिले आहे, तें ध्यानास आणून त्याचा जाबसाल समर्पक आलियाने समाधान होईल. भेटीचे प्रसगास यास व रा। देसाई यास आज्ञा कराल त्याप्रमाणे देतील सवेसीं श्रु* होय हे विज्ञापना.

¶*Visaji Narayan writes to the Peshwa from Yadwad, expressing his delight at the arrival of the Peshwa at Savnur and reporting the regret of Bhimappa Desai in being unable to meet the Peshwa and get his disputes adjusted*

---

*No 81]* *[19-4 1753*

**श्रीगजानन**

श्रीमत राजश्री पत

प्रधान स्वामीचे सेवेसी

विनती सेवक गणेश बलाल दामले कृतानेक साष्टाग नमस्कार विज्ञापना ता। छ १४ जाखर मु॥ घेरवळी प्रात देवले नजीक विशालगड तलघाट स्वामीच्या कृपावलोकनेकरून सेवकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष पूर्वी पत्री आवाजी नाईक बाबूजी नाईक युध्यप्रसगी गर्वभग होऊन राजश्री प्रतिनिधि यशस्वी होऊन साताराचे ग्रहस्त त्याची उभारणी करणार व मातुश्री सतोशी जाली याचे वृत सेवेसी लिहून पाठविले ते विदित जाहालेच असेल पुढे विशालगडास आगरे याचा मोर्चा लागला. इकडे प्रतिनिधीस जाणे जरूर, परतु वसतगडचे पारिपत्य करावे म्हणौन वसतगडास लागलो. तेथे प्रतिनिधि आणा अनमान करीत होते, तेव्हा त्यासी बीर देऊन तेथे राहून तेथील तहरह करून राजश्री कानोजी मोहिते

\+ सौन्ती येथें

आपल्या विद्यमाने भेटऊन त्यासी आपले मर्जीत स्वामीच्या आज्ञेत वर्तत हे निराले मार्गे कितेक पुढे आईसाहेबाकडील मर्जी ठिकाणी आणून यावी याविसी आणक्रिया घेऊन त्यात त्याचे कल्याण स्वामीची सेवा घडोन यावी याअन्वये बुधिवाद सांगोन समागमे घेऊन आलो. त्यासी मध्ये याणी त्याची मर्जी बिघडून मागती किल्यावरी जाऊन धामधूम माडिली. तेव्हा फिरोन त्याजकडे पत्रे पाठऊन आणा मसुरेस आहेत तेथे आणिले आणि विशालगडचे कुमकेस आलो. राजश्री दादोपंत अनमान करीत होते, परंतु बाबूजी नाईक याचे युध्य जाल्यास दुसरे दिवसी आलो. समयास आलो नाही. तेव्हां पुढे याजवरी काही स्वामीचा उपकार जाहाला पाहिजे यैसे समजोन राजश्री दादोपंतास श्रीमंताची मर्जी आहे यैसे सांगोन इकडे आणिले. तो स्वामीची पत्रे प्रतिनिधीस आली की विशालगडिचे कुमकेस आमची फौज व आपली फौज देऊन साहित्य करणे. श्रीमंत राजश्री विस्वासराऊ स्वामीची पत्रे आली की विनापरवानगी जावयाचे नव्हते. त्यासी पत्रे पुणियासी पाठविली त्याचे प्रतिउत्तर येक मास न ये. तेव्हा राजश्री दिनकरपंत यासी पत्र लिहिले त्याचे उत्तर आले की विशालगडचे कुमकेसे जाणे त्यावरून आलो. नंतर विशा(ल)गडास आलो, तो प्रतिनिधि समागमे सातसे राऊत हशम विशालगडचे मनास आणिता सात आठसे त्यासी पोटास नाही. गडाखाली दोन कोसावरी मेढे त्यात माणूस किती आहे ती बातमी नाही. अमृतराऊ सत्यभामाबाई येक नाही. किल्यावरी कारभारी सेभर यैसे जाणून मेढेयांत शंकराजी विस्वासराऊ होते त्यास पत्र लिहिले.. त्यात लिहिले, पुरातन आम्ही सरखेलच्या राज्यातील, या प्रसंगी आमच्या श्रीमंतानी या श्रीमंताच्या साहित्यास पाठविले आहे. तुमचे ठाई मानाजी पायेगुडे याची घोडे बारगीर नेले आहेत ते सळ हृदयांत आहे. प्रतिनिधीसी आपण लाविले तेहि तुमचेठाई विरुध, तेव्हा खाली उतरल्यास मुलुकाची खराबी होईल तरी प्रसंगी आम्ही आहो. चाकरी सरखेल घेतील तरी करून दाखऊ. या अन्वये लिहून त्याजकडील मध्यस्त आणून मुलुकाचा नाश न करिता मेढे उठऊन लाऊन प्रतिनिधि सरखेल याच्या भेटी कराव्या निश्चयात आणून छ मारी दर्शनास आगरे पुढे येणार, आम्ही पुढे जावे म्हणून नियोन गेलो. येविसीचे व स्वामी सेवा कोणे-रितीने करितो याचे वृत राजश्री गोविंदराऊ लिहितील व दर्शनाती निवेदन करितील; व राजश्री दिनकरपंत यासी आमचे मध्यस्तीने ह्या गोष्टी जाल्या कार्याच्या नाहीं म्हणौन रा दादोपंतास पत्रे कसी लिहिली आहेत तेहि निवेदन गोविंदराऊ करितील. सेवेसी श्रृत होय हे विज्ञापना.

¶*Ganesh Ballal informs the Peshwa of the difficulties he had encountered in assaulting the fort of Vishalgad and in effecting reconciliation between the Pratinidhi and Angria.*

No 82] [19-8-1753

श्री

राजश्री माहादाजीपंत
गोसावी यासी

॥ सकलगुणालंकरण अखडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्री रघोजी भोसले सेनासाहिबसुभा दंडवत विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहित असिले पाहिजे विशेष. दिलीस सार्वभौमाकडील वकिलीचे प्रयोजन राजश्री कृष्णाजी केशव यास सागोन पाठविले आहेत. त्यास राजश्री पंतप्रधान याजकडील दिलीचे वकील राजश्री दामोदर माहादेव साप्रत पुण्यातच आहेत, तरी गोसावी यानी स्वमुखें जे सागणे ते सागोन याची त्याची ऐक्यता करून देविली पाहिजे व पंडित मारनिलेची पत्रे पातशाहास व मनसूरआलीखा यास मारनिले सागतील त्याप्रमाणे देवावी आपले भरोसियावरी यास पाठविले [शिक्का] आहेत. तरी लिहिल्याप्रमाणे याचे साहित्य होऊन येई तो अर्थ केला पाहिजे. रा छ १९ माहे शौवाल बहुत काये लिहिणे लोभ असू दीजे हे विनंती.

*¶Raghuji Bhonsle requests Mahadoba Purandare to recommend to the Hingnes, Krishnaji Keshao whom the writer has appointed his representative at the Court of Delhi*

---

No 83] [8 2-1754

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य
राजश्री त्रिंबकराव स्वामीचे शेवेसी

पोष्य जनार्दन बलाल कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील कुशल ता छ २२ रावखर जाणून स्वकीयें कुशल लिहीत गेले पाहिजे विशेष. तुम्ही पत्र पाठविले तें पावले. तीर्थस्वरूप राजश्री गणपतराव मामा यास माघ वद्य प्रतिपदेस शुक्रवारी देवआज्ञा जाहाली म्हणून लिहिले ते कळले, ईश्वरें बहुत गोष्ट वाईट केली. ईश्वरी सत्तेस उपाये नाही ईश्वरी सत्ता प्रमाण करून काय लिहिणे. कृपा लोभ असो दीजे हे विनंति.

*¶Janardan Ballal Fadnis communicates to Trimbakrao the news of the death of Ganapatrao Mehendale*

No. 84] [6-10-1754

## श्रीरामोजयति

सेवेसी विज्ञापना रामचंद्रबाबा याचे वर्तमान केशवराव हरकारे याचे घरी आले. आश्विन वद्य पंचमीस काल जाहाला. दोन तुला सोन्याच्या व दोन तुला रुप्याच्या केल्या. उभयेता श्रीमंत नित्य घरी जात असेत. उपाये फार केला परंतु न चालला. त्याचे मावसभाऊ गोपाळराम त्याचे फार समाधान केले. श्रीमंत भाऊसाहेब वाहि गेले होते म्हणून लिहिले आहे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*The writer reports the death of Ramachandrababa.*

---

No. 85] [19-4-1755

## श्री

श्रीमंत राजेश्री पंतप्रधान
स्वामीचे सेवेसी विज्ञापणा

सेवक लक्षुमण चाबुकस्वार चरणावर मस्तक ठेऊन सां। ना। विज्ञापणा आसा जे. स्वामीनी कलवांताचे ताफ्याविसई लि॥ त्यास पत्र येतांच स्वार होऊन सहरास गेलो. तेथून जे तार्फ येतील यास पाठऊन देतो. परंतु येक पत्र दरगाकुलीखान यास आलियाने तार्फ येतील. नाही तर अनमान * * * * याजकरिता सेवेसी विनंति लि॥ आसे. आनि आपनहि त्यास बोलाविती. जर आली तर पाठवीतच आहे. परंतु आमचे आयेकनार नाहीत. इतकियाकरता दरगाकुलीखानास पत्र पाहिजे. हली पानें विड्याची सुमार २००० दोन हजार सेवेसी पाठविली आहेत ते प्रविस्ट होतील. बहुत काये लि॥ कृपा सेवकावर निरंतर असो देण हे विज्ञापणा. मिति सके १६७७ युवानाम संवछरे वैशाक सुध ८ रा गोविंदराव राम याजबा ऐवज बाकी राहिला तो रदकर्जी लि॥ म्हणऊन लि॥ त्यास उत्तम. स्वामीच्या लि॥ प्रमान जमाखर्च केला.

¶*One Lakshman undertakes to send a party of dancing girls but requests the Peshwa to write to Dargahkulikhan to expedite the matter.*

---

No. 86] [28-11-1755

## श्री

तीर्थस्वरूप राजश्री देवबादादा स्वामी
वडिलांचे सेवेसी

अपत्यें जिवाजीनें चरणावर मस्तक ठेऊन विनंती. आज कार्तिक वद्य नवमी मुकाम किल्ले भगवंतगडीं फौजसुद्धां वडिलांचे आशी(र्वादें) क्षेम आहों. यानंतर

आम्हाकडील वर्तमान तर राजश्री चे आज्ञेनें राजश्री रघुनाथ दळवी व आम्ही व वरकड सरदार ऐसे भगवंतगडीं आलो. आठ च्यार रोज जमाव जुडे-पर्यंत आंगरेकडील आवई आली कीं फिरंगी व आंगरा येक होऊन अरमार व खुप्रगीनें भगवंतगडास येतात * * * * आली तों मागलेकडून गनीम येऊन भगवंतगडास छ १४ सफरी लागला. युध्य प्रसंग होणे तो जाहाला. गनीम पराभव पावून आला, ते सविस्तर वृत्त राजश्रीच्या पत्रावरून विदित होईल. पुन्हा आंगरा व फिरंगी येक होऊन भगवंतगडास येतात. येका चौ रोजांत येऊन त्यांचा आमचा युध्यप्रसंग होतो. गनीमाची नेटबाजी भारी ऐसी समजोन राजेश्री मल्हारी (?) येऊन राहिले आहेत. नांदिवडेस कृष्णाजी माहादेव याजकडेस जावें याजकरिता श्रीमंतांचीं पत्रे हमेशा येत होतीं; परंतु भगवंतगडासच गनीमाचा मारा पडला तेव्हा नादिवडेस जाणेंच राहिलें. भगवंतगडाहूनच काय होणे तें होईल. इंग्रज विजयदुर्गास येणार तेव्हां खुष्कीनें फौज जावी ऐसे होतें; परंतु क * * (?) विजयदुर्गी जाऊन राहिला तेव्हां इंग्रज विजयदुर्गास येत नाहीं; त्यामुळें खुष्कीनें फौज कशी विजयदुर्गास जाती? तेव्हा प्रस्तुत कजिया आम्हाचवर बनोन अला. बरें, श्रीची दया, वडिलाचें पुण्य असता चिंता काय आहे? होईल वर्तमान ते मागून लिहून पाठऊं. वरकड आम्हा-कडील मजकूर सर्व येथास्थित आहे. आम्ही मलरीस (?) आहों, घरीं सध्या जातां नये. राजश्री प्रतिपदेस नारळ ठेऊन वाडीस जातील. नारळ ठेऊन माघारां तसेच येतील. बाकटलीचीं (?) गलबतें सात स्वारीस सिद्ध केलीं; तीन स्वारीस जाऊन फिरोन आलीं. पैदास्त जाहाली नाही. याउपर सातहि समागमेंच रवाना केलीं आहेत. विठ्ठलराम पायगाऊकर (?) बावडेस गेले आहेत. येताच मजकुर समजोन वडिलाकडेस रवाना करितों. मातुश्रीस वरघाटीं न्यावेंयास चिरंजीव गुणवाने पालखी पाठविली होती, न जावे ऐसें लिहिले होतें; परंतु त्याचा आग्रह जाणेचा असला तर गेलीच असतील. वडिलीं बहुत रोज ठेऊं नयेत. सर्वेच भेटून खाली रवाना करून द्यावी. वरकड घरांतील मजकूर सविस्तर तीर्थस्वरूपांनीं लिहिला आहे त्याजवरून विदित होईल. हें विनंती.

¶*Jivaji Khanderao writes to Deoba Dada ( Devrao Meghashyam ?) about a skirmish which he had with the combined forces of the Portuguese and the Angria at Bhagvantgad.*

6909

श्री

यादी

नाईक अजणकर हरसी याजपासून तुळाजी आंगरे याणी घेतली माघ शुा २ रक्ताक्षीनाम संवत्सर शके १६६६ सन खमस आर्बाईन मया व अल्फ यासी घेतली किले अजण वेल ती त्याजवर बाळाजी बाजीराव पंत प्रधान याणी शके १६७७ युवानाम संवत्सरे पौष शुा १४ मंगळवारी घेतली सन सीत खमसैन मया व अलफ यास मामलेदार कारकीर्द पंत प्रधान

१ रामाजी माहादेव बिवलकर सुभेदार यानकडे सन सीत खमसैन यकसाला होता शके १६७७ युवानाम संवत्सरे.

१ डीा सन सबा खमसैन मया व अल्फ शके १६७८ धातानाम संवत्सरे चिमाजी माणकर सुभेदार ताा सितैन अखेरपर्यंत च्यार साल

१ सन इहिदे सितैन गणेश कृष्ण कानेटकर यानकडे येक साला होती शके १६८२ विक्रम नाम संवत्सरे

१ चिमाजी माणकर डीा सन इसन्नै सितैन शके १६८३ वृषानाम संवत्सरे ताा सन सलास सितैन दोन साला होती त्या

१ सन अर्बा सितैन कृष्णाजी विस्वनाथ वर्वे शके १६८५ सुभानुनाम संवत्सर ताा सन समानीन मया व अल्फ शके १७०१ विकारीनाम संवत्सरे पाच मासपर्यंत

१ सन सामानीन मया व अल्फ शके १७०१ विकारीनाम संवत्सरे विनायक कृष्ण ताा सन सलास तिसैन शके १७१४ परिधावी नाम संवत्सर जेष्ट वा ११ साले चवदा साल

(1) 23-1 1745 (2) 17 1 1756

१ सन सलास तिसैन ता सन सबा तिसैन अखर शके १७१८ जलनाम संवत्सरे रघुनाथ त्रिंबक वर्वे.

१ बालकृष्ण बापूजी लेले सन समान तिसैन शके १७१९ पिंगलनाम सवत्सरे येकसाला.

१ सन तिसा तिसैन रघुनाथ त्रिंबक शके १७२० कालयुक्त नाम सवत्सर येकसाल.

१ सन मयातैन बालकृष्ण बापूजी लेले शके १७२१ सिध्यर्थी नाम सवत्सरे.

१ सन ईहिदे मयातैन रघुनाथ त्रिंबक शके १७२२ रौद्रनाम संवत्सरे ता सन सलास मया तैन अखेर तीन सालापर्यंत.

१ जजिरे सुवर्णदुर्ग सन खमस सितैनात अगिरा सवत्सरी अंगरे याजपासून बालाजी बाजीराव यानीं घेतला शके १६७६ भावनाम संवत्सरे.

¶*This is a chronological list of the Mamlatdars of Anjanvel.*

---

No. 88] [30-1-1756

श्री

तीर्थस्वरूप राजश्री जावजी बावा
वडिलाचे सेवेसी

अपत्ये म्हलोजी गोळी दंडवत विज्ञापना वडिलाचा निरोप घेऊन स्वार जालो ते येसवतगडास शुक्रवारी साईकाली पावलो. गडास मोरचे जवळ लागले आहेत. त्यास रा तुलाजी अंगरे याजकडील ठाकूर व सुभानजी गोरकर हे *त्याजकडून सनवार (!) रा खडोजी मान*कर *याजकडे आले. त्यास याचा त्याचा* भेटीचा मजकुराचा इतबार पटत नाहीं, तरी आपण खबरदारीने राहणे. रा खंडोजी माणकर ज्या तलावर होते त्या तलावर येऊन राहावे. रा तुलाजी अंगरे याचा सोमवारी भेटीस यावयाचा सिधात मात्र केला आहे परंतु सवे (तसे !) दिसत नाही. आंजणवेलीकडून रा रामाजीपंत यानी कागद तुम्हास लिहिले आहेत ते रा खडोजी माणकर याच्या माणसाहाती पाठविले आहेत. रा तुळोजी अंगरे याचे कागद रा खडोजी अंगरे याच्या राउताहाती पाठविले आहेत

6911

ते पावतील. खारं मासे पाठविले आहेत घेऊन पावलीयाचे उतर पाठवणे. कोरे कागदाची पाने दोन तीन पाठऊन घ्यावी. येथे धारण या प्रकारची आहे, त्यास पोटापाणीयाची खबर घ्यावी. तुम्ही तो घ्यालच परंतु सूचना मात्र लिहिले आहे. बहुत काये लिहिणे हे विज्ञापना.

¶*Mhaloji Gauli informs Javji Gauli of the movements of Tulaji Angria and Khandoji Mankar and advises the addressee where he should encamp.*

---

*No. 89]* *[26-2-1756?*

**श्री**

श्रीमंत माहाराज राजश्री
भाऊसाहेबाचे शेवेसी

प्रतिपूर्वक निंबाबाई सिंदे दडवत विज्ञापना. ता छ २९ जमादिलौवलपरयेत साहेबाचे कृपाअवलोकनेकरोन वर्तमान येथास्थित असे विशेष. चिरंजीव राजश्री खेम सांवत भोसले सरदेसाई यांजविसी चिरंजीव राजश्री पाटीलबावानी साहेबास विनंती केलीच होती. आण माहाराजानी मान्य केलीच आहे. यैसियासी श्रीमंत राजश्री नानासाहेब ते प्रांती जाणार आहेत म्हणोन यैकिले, त्यास खेम-सांवत यांचा सिदगड व सालसी त्याचा मुलूक त्यास द्यावा म्हणोन साहेबी नाना-साहेबास येक पत्र देवोन सदरहू सिदगड व सालसी मारनुलेची मारनुलेचे श्वाधीन होवोन त्यांच्या जिल्यामधे उपसर्ग न होई ते करणार माहाराज धणी आहेत. मारनुलेचे सर्व प्रकारे अगत्य साहेबासच आहे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति.

¶*Nimbabai, mother of Jayappa Sindia, requests Bhausaheb and Nana-saheb to restore Sidhgad and Salsi to the Sawants of Wadi.*

---

*No. 90]* *[28-2-1756*

**श्री**

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीचे शेवेसी

आज्ञाधारक नारो त्रिंबक चरणावर मस्तक ठेऊन सिरसाष्टांग नमस्कार विज्ञास. ता छ २७ माहे जमादिलावलपावेतो सेवकाचे व राजपुर प्रांतीचे वर्तमान येथास्थित असे विशेष. आज्ञापत्र सादर जाले तेथे आज्ञा, की शामलाकडून भले माणूस येथे आले आहेत. त्यानी मजकूर घातला जे दास्तान माडले येथे चौकी वसवावयाचा दुतर्फा करार होता म्हणून आम्ही ठाणे पाठीविले. सरकारतर्फेचे ठाणे यावे ते न

आले; आणि आमचे लोक बसले ते उठऊन लाविले. त्यास ठाणे बसावयाचा तह केला आणि ठाणे आपलेकडील लोक व तिकडील लोक येसे दुतर्फा जाऊन ठाणे बसावे ते त्याचेच कां बसले? बसलीयावर उठविलें कां व पुढे बसवावे की नाही. त्याचा जाबसाल जाला पाहिजे. तर साद्यात वर्तमान लिहून पाठवणे म्हणून आज्ञा. त्यास पूर्वी शामळाकडील व सरकारतर्फेचे मिळून चौकी होती. याजवर बाणकोट हबशाकड आला तेव्हा आम्हाकडून दुतर्फे चौकी त्यानी बाणकोटी बसऊन तेथे घेऊ लागले. आम्हाकडील चौकी तर गेली. तेव्हा आम्ही सापेगाव बदरकिनारा आहे तेथे.खाडीचे तास लाहान जाले आहे ते नस्त पाहून आपले तर्फेची चौकी बसली. ते बाणकोटी आपली तक्षीम घेत आम्ही साप्यास घेऊ येसे काही दिवस चालले. त्याजवर बाणकोट आंगारकाने बसविले, शामळास उठऊन दिल्हे. पुढे आजणवेल घेतली, तिकडून शामळ अगदी खरडून काडला तेव्हा चौक्रीस थारा नाही येसे जाले. त्याजवर आपलेकडून शामळाचा बिवाडा जाला तेव्हा साडतीन माहाल आगदीच मना केले. जेसमई तह झाला ते समई त्यानी येक परगणा सरकारात देऊन तह केला, ते समई दुतर्फा चौकीची बोली केली जे साप्यास तुम्ही घेता ते न ध्यावे. माडल्यास दुतर्फा चौकी बसवावी येसा करार केला त्यास जाबसाल जाला जे आगरकाकड तुमचा बिवाड आहे. तुम्हास तिकडून काही प्राप्ति नाही. जेव्हा तुम्हाकड होते तेव्हा आम्हाकडून हसील घेऊन तिकड गड तुम्हास दिला, * * तो अंगारक घेतो. तुम्ही हिकडे घेऊ लागलेस म्हणजे रयतेस जलाल जाले. तुम्ही तिकड बसविल ते ते आगारक घेईल, हिकट मागती तुम्ही घ्याल येसे दुबारा होते. आगारक तुम्हास बसू देणार नाही. त्यास त्यानी मान्य केले की आमचा त्याचा तह करून देणे. त्याजवरून त्याकडील कारकून बोलाऊन आम्ही तहाचा मजकुर करावयास मुलाना वलीमहमद आले त्यास आम्हाकडून बोली लागून तह आगारक करितो हा भाव समजोन त्याचे कारकून केसोपंत लिमये आले होते, त्यास जंजिरा घेऊन जाऊन आम्हास मध्येस्तास टाकून परभाराच तह केला. काही वंत त्यानी घ्यावासा करार केला. त्याजवर येक वर्ष चौकीचा मजकूर सोडला होता. हाली सालमजकुरी चौकी बसवावी म्हणून मजकूर केला. तेव्हा आम्ही साफ लिहिले जे आंगारकाचा तुमचा तह नव्हता तेव्हा तुम्ही चौकी बसविणार होतेस ते बसविली * * हाली त्यांजकडील तुम्हास काही वंत आला, तेव्हा तुमचे चौकीचे यैवजी आला त्याचा मजकूर कसा आहे तो लिहिणे. मग तुम्हास काही तिकड प्राप्त काही नसले तर दुतर्फा चौकी बसेल ते गोष्टीचा जावसाल न करिता जंजिराहून पंनास माणूस पाठऊन चौकी बसवली. त्याजवर मार्गी आम्ही लिहून पाठविले जे दुतर्फा प्रांत येकतर्फे चौकी बसवावी येसे नाही. त्याने

त्याची चौकी बसताच आगदी जलमार्ग पडला. ठाणीयास निवारा हसील पडो लागला. त्यामुळे वेपारी कस्टी, इजारा जकाती गोरेगावच्या दिल्हा होत्या त्या आगदी पडल्या. मुतलक पैसा आकारला नाही. ग्याईत गलबत बंद आंगारकानि केले, त्याजवरून मागती जंजिरा आम्ही लिहिले परंतु जात्रसाल नाहीत. तेव्हां चौकी उठऊन दिली. यापूर्वीही तुलाजी आंगरे याकडून बापूजीपंत बिवलकर आले तेव्हा त्यानी हजूरचे चौकीसाठी विनंती केली होती की माडल्याची चौकी शामलाम बसवून द्यावी. त्याजवरून आम्हास पहिले हजूरचे ताकीदपत्रहि आहे जे माडल्यास चौकी शामलाची बसऊन देणे. याजकारणे चौकी उठऊन लाविली. बाणकोट शामले घेतला त्यापासून शामलाची चौकी माडल्यास नाही. सेवसी सांप्रांत वर्तमान लिहिले असेत. खाडी शामलास जाली म्हणजे मतगडास आपाये आहे. गोरेगावच्या जकाती पडतात. हिकड हसील आहे तो बाणकोटी शामलाचे तर्फेचा घेतात, तेव्हा इकड जर त्याची चौकी बसली तर दुबारा ज्याजती कानू होईल. तेव्हा सहजच बंदर गोरेगावचे पडले. ये जातीचे वर्तमान आहे. तेथे चौकी त्याची त्याची कार्याची नाही. सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति.

¶[*Naro Trimbak writes to the Peshwa how Bankot and Mandle changed hands from time to time between the Peshwa, the Angrias and the Sidi and the difficulties it caused to shipping.*

---

*No. 91*] [*Recd. 2-3-1756*

पौ छ ३० जावल.

श्री

राजश्री जावजी गौली

गोसावी यांसी

ॐ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्री खंडोजी माणकर रामराम विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीय लेखन केले पाहिजे विशेष. आपण पत्र पाठविले पावले. राजश्री सरस्वतीची मुले माणसाकडील वर्तमान लिहावयाविसी लिहा. यैशास समस्त सुखरूप आहेत. लाहान मुलाच्या देवी उताराखाले पडल्या, काही फिकीर नाही. वरकड किल्यावरील इंग्रज निघत नाही. इंग्रज हजारापर्यंत राहाणार. राजश्री रामाजीपंत याकडील पंचवीस माणूस निस्याण ठेवावे आणि राजश्री रामाजीपंत इंग्रजसुधा मुंबईस उदईक जाणार. तेथून बोलीप्रमाणे कैसी काय निभावणी होईल ते पाहावी. तेथून चिठी

आलियावरी इग्रज जाईल किंवा राहील पाहावे. सर्व मालति तो पहिलीच नेली. हा प्रकार आहे. आपण सरखली बा आहेत, सर्व प्रकार साभाळून न्यावे. वहुत काये लिहिणे लोभ आसो दीजे हे विनंती.

*¶Khandoji Mankar writes to Devji Gouli about Tulaji Angria's children and about the refusal of the English to deliver the fort of Vijaydurg to Ramaji Mahadeo*

---

*No. 92*] *[8-4-1756*

नकल

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री
गोविंद सिवराम स्वामी गोसावी यासी

पो बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष. नवाव सलाबतजंग आमच्या मदतीस मजल दरमजल येऊन पावले. शाहानवाज खान व मुसाबुसी याची भेट छ ४ रजबी जाहाली. नवाबाची मुलाजमत येका दो दिवसी होईल. मुरारराव वगैरे यास सावनुरात तग केलेच आहेत. सरकारच्या फौजाचे मोर्चे गावकुसापावेतो गेले. नवाबाचा तोफखानाहि लागेल. अत:पर पारपत्य त्याचे सत्वरच होईल. तिकडील वर्तमान अलीकडे कलत नाही. राजश्री रामाजी माहादेव मुंबईस गेले आहेत. इंग्रेज देहावर येऊन किला देतो की नाही, मारनिल्हे जाऊन काये विच्यार आले न आले ते सविस्तर लिहिणे. वरकड कितेक तपसील लिहिणे. पहिले लिहिलेच आहेत. नवाबाची मुलाजमत छ ६ रजबी जाहली. या उपरी श्रीकृपेने सत्वरच शत्रूचे पारपत्य होईल. जाणिजे छ ७ रजब सुरु सीत खमसेन मया व अलफ. बहुत काय लिहिणे. तेथील कार्यसिध्दि लवकर होता दिसत नाही, तथापि तुम्ही गेलियावर उपायास अतर होणार नाही हे विनंति.

*¶Peshwa Balajirao writes to Govind Shivaram Khasgiwale, communicating the writer's visit with Nawab Salabatjang and the stiff fight he was conducting before Savnur.*

---

*No. 93*] *[28-4-1756*

नकल

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री
गोविंद सिवराम स्वामी गोसावी यासी

पो बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष. इकडील वर्तमान तरी मुरारराव घोरपडे व पठाण

यास गावांत जेरकेले. मोर्चे चराजवळ गेले. त्यांस नवाब सलाबतजंग आले. याच्या आमच्या भेटी जाल्यावर याचा तोफखाना लागू करून दोन्ही तोफखान्याचा मार फारच जाला, तेव्हा त्यांणी तहाचा मजकूर करून सावनूर प्रांत निमे व आकरा लक्ष रुपये देऊन तह केला. मुराररायानी चाकर होऊन चाकरी करावी, पुण्यास यावें याप्रो करार जाला. या उपरी थर्कड संस्थानिकाकडील खंडण्या विल्हे लागतील. नवाब आमच्या डेन्यास आले होते. शाहानवाजखान व मुसावुसी हमेशा येतच आसतात. फारच श्नेह ममता नवाब धरितात. अत:पर इकडील गुंता सत्वरच विल्हे लागेल. तिकडील वर्तमान कळत नाही. रामाजी माहादेव मुंबईस गेले होते ते आले न आले, इंग्रेज देहावर येतो न येतो ते लिहिणे. वरे तजविजेने श्वकार्य साधून येणे छ २७ रजब हे विनंति.

¶*Peshwa Balajirao writes to Govind Shivaram communicating the end of the siege of Savanur and the terms of peace agreed upon.*

---

*No. 94]* *[9-5-1756*

पो छ २८ रमजान

## श्रीशंकर

चिरंजीव राजश्री आमृतराव यासी दरदाचे आसीर्वाद. उपरी येथील कुशल जाणून स्वकीये लिहिणे विशेष. तुमचे प्रयोजन आहे. तरी श्रावणमासी सडो[+] येणें. फार सडा होऊन येणे. तेथे सामदेव (पुरा)णिक कारभारी ठेऊन व प्रकृतिही ते (थेच राहातील[१]) येकटा मात्र येका तटानिसी येणे. व्याघ्राचे ताकीद पत्र येसाजीस आणविले होते, ते बळीवर्दाने सुधेसे पाठविले नाही. परंतु तांतडीने जसे दिल्हे तसेच पाठविलें आहे. प्रयोजन पडल्यास देणे. नाही तरी जवळच ठेवणे. अनेकांतास तरी पहिलें पत्र पाठविलेंच आहे. वरकड मजकूर तरी पहिले लिहिलेच आहेत. नवे ल्याहाव(या योग्य) नाही. इकडील वर्तमान तरी शार्दूलसिंहसहित दरद तुंगभद्रा तीरी आहे. व्याघ्रास मात्र निरोप देशास जावयास जाहाला. याचेही येणे देशास लौकर होईल. बहुत काये लिहिणे हे आसीर्वाद. वैशाख शुध १० दशमी रविवार मुकाम तुंगभद्रा दक्षणतीर हे आसीर्वाद.

¶*Addressed by Darada (a nom-de-plume) to Amritrao from the banks of the river Tungabhadra. The letter appears to be written in ciphers. Two letters of a similar nature are already printed, Nos. 1 and 2 in Selection 19. This one has a few more items expressed in ciphers. The handwriting does not shew it to be written by Raghunathrao. The dates of writing and of receipt can tally only for the year 1756. In that case the addressee Amritrao cannot be Raghunathrao's adopted son. The three letters require to be accurately interpreted.*

---

\+ असाच शब्द आहे. १ यथें कागद फाटला आहे.

No. 95] [13-5-1756

श्री

सेवसी सेत्याजी खराडे विनंती विज्ञापना येसीजे. राजश्री मुरारराव घोरपटे याचे कूच आजी चतुर्दशी गुरुवारी होऊन दोन कोसावर गेले. इतके दिवस लोकाचा मोठा गवगवा होता. साहेबाची आज्ञा तों सेंडुरास पोहचाऊन कार्ये करून येणे. येथील प्रसंग तो या रीतीचा आहे. येविसी रा मुकुंदरायानी सेवसी विनंतीपत्र लि॥ आहे, त्यावरून श्रुत होईल. मुसाफरजंगाच्या लोकानी गवगवा करून कूच होऊ देत नव्हते याजमुले त्यांच्या डेरियास मुकुंदराव व आपण गेलो होतो. त्याच्या लोकाचे समाधान करून कूच करावे येसे जाहाले. मुसाफरजंगाने कफणी घाळून फकीर होऊन बैसला आहे. त्यास साहेबाकडून मारकडील रो कोनेरराव आले त्यानी किंतेक गोष्टी सांगितल्या त्याजवरून आम्हासहि सुचले तितके मुसाफरजंगासी बोलिलो. तो बोलिला जे, इतकियावर चाकरी कोन्हाची करावी ? श्रीमंतानी कृपा करून सेवा घेतली तर सेवा करू. नाही तर फकिरी निश्चये करणे. च्यार महिने बरसात आपल्या पिराचे जागा कर्मून मग मकेस जातो हा निश्चये करून आहे; यांत साहेब धनी आहेत. पदरी वाळगावा येसे धन्याच्या ध्यानात आसेले तर आम्हास आज्ञापत्र आलिया मुसाफरजंगास भेटीस घेऊन येऊ; अथवा रा मुकुंदयारास साहेबापवितों पाठऊ. जे आज्ञा होईल त्यासारखे वर्तणूक करू. सेवसी विज्ञापना शृत होये.

¶*Setyaji Kharade reports the march of Murarrao Ghorpade to Sondur.*

---

No. 96] [18-5-1756

## श्रीमोरया

श्रीमंत राजश्री भाऊसाहेबाचे शेवेसी

विनंती सेवक मलारजी होल्कर कृतानेक विज्ञापना येथील क्षेम वैशाख वद्य पंचमी मु॥ मलप्रभा येथास्थित असे विशेष. साहेबापासून आज्ञा घेऊन स्वार जाला ते मार्गी मुलगुंदचे ठाणे घेऊन तेथें सरकारचे ठाणे वसऊन छ १६ साबानी मु॥ मजकुरास येऊन वार (?) मुकाम केला. आलीकडे त्याच नईचा फाटा होता तो कळलाच नाही. रात्री नदी पाणी आलें. नदी फांटा येक होऊन राहावयाचे स्थली गुडग्यावराबर पाणी जाले. बारा प्रहर केवळ उभेच राहिलो. लस्कर हैराण विशेष जाले. कर्म दुर्घट होते. परंतु स्वामीचा प्रताप थोर

याजकरितां बारा प्रहरा संध्याकाळापासोन उतार पडला आणिक येक रात्र दम खाऊन छ १८ साबानी लस्करसह वर्तमान पार आलो. पुढे कूच होऊन जात असों.. शेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Malharrao Holkar reports to Bhausaheb his return from Karnatak and the hardships he suffered from floods on the way.*

---

*No. 97*] [*22-5-1756*]

**श्रीमोरया**

श्रीमंत राजश्री दादासा-
हेबाचे शेवेसी

विनंती शेवक मल्हारजी होलकर कृतानेक विज्ञापना. येथील कुशल वैशाख वद्य नवमी मुा मुधल घटप्रभातीर साहेबाचे कृपेकरून येथास्थित आसे विशेष. आम्हां आलियातागाईत तिकडील वर्तमान कलत नाहीं तर सविस्तर लेखन क(रा)वयासी आज्ञा केली पाहिजे. इकडील वृत मलप्रभेच्या मुकामीहून विनतीपत्रे पाठविली ते शेवेसी पावली आसतील. तेथून दो मजलीनी मुकाम मजकुरास आलो. येथे नदीस पाणी याजकरितां मुकाम केला. सत्वरीच उतरून पुढे जाऊ. शेवसी श्रुत होये हे विज्ञप्ति.

¶*Malharji Holkar writes to Raghunathrao about his halt at Mudhol on the Ghataprabha.*

---

*No. 98*] [*2-6-1756*]

**श्री**

श्रियाविराजित राजमान्ये
राजश्री नारोपंत नाना
स्वामीचे सेवेसी

पांन्ये विसाजी बाबूराव कृतानेक सां नमस्कार विनंती येथील क्षेम छ ३ शवाल मुकाम मडकसिरे येथास्तित आसो विशेष. राजश्री श्रीनिवासराव व राजश्री राघो गगाधर यासी राजश्री राव ममलकतमदार याही निरोप दिल्हा. पंत मशारनुलेस वस्त्रे व खर्चास व येक टांकन[1] बसावयासी दिल्हा. मुलगुदास राजश्री विठल विश्राम याजकडे जाऊन ठाणे मुलगुदचे व राजश्री हरिपंताकडे साडेबत्तीस हजार हा साल दरसाल तनखा श्रीमंत स्वामीनी करून दिल्हा. त्याप्रमाने रुजुवात करून नागोजीराव पुनियास जातील. जासुदाचे रोजमरे तेरीख जाली, कृपा करून रोजमरा देविले पाहिजे. आमचा रोजमरा दीड माहीचा पाठविला पाहिजे.

---

१ एकजातीचा घोडा.

आवदागिरीचा कलस येथे तयार करविला. सरंजाम पाठविला पाहिजे. आवदा गिरियाचा रोजमरा दिवस्या सारवान मोहतादार याचे रोजमरे पाठविले पाहिजे. येथील कारभार राजश्री अमृतरावजीस विदित आहे. मानकोजी कडू सरकारात हुजूर पागेस आहे. त्याचा लेक गोकाकेवर दारूखाना उडाला ते वेलेस उडाला म्हणौन येकिले, तो येथे राजश्री मुरारराव घोरपडे ममलकतमदार याजपासी आहे. रायानी आम्हास बोलाऊन दाखविला. तो नव्हे म्हणौन तोच बोलत होता. त्यास राजश्री नरसिगराव यास पत्र लिहिले आहे. वलखनारास पाठविल्या वलखोन घेऊन जातील. याजकरिता रायानी आम्हास सांगितल्यावरून पत्र सेवेसी लिहिले आहे. आमच्या रोजमरियास पाच सा दिवस उणे आसले तर रोजमरा पाठवावे. खर्चायास येथे मिलत नाही. कोन्ही कर्जेहि देत नाही. हे विनंती. चिरंजिव जगनाथ आपणापासी आहे. त्यास रोजमरा पुरत नाही तर आर्जवाव देविली पाहिजे. चिरजीव राजश्री सदासिव यास येथून श्रीनिवासराव यासमागमे गावास वाटे लाविले. हे विनंती.

¶*Visaji Baburao informs Naropant Nana (Naro Appaji?) of his having effected a settlement with Murarrao Ghorpade and asks for money for defraying the expenses of troops under his (the writer's) command.*

---

[26-10-1755?

No. 98A]

पौ छ २१ रविलाखर

श्री

राजश्री जावजी गौली

गोसावी यासी

ॐ अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्री तुलाजी आगरे सरखेल रामराम येथील कुशल जाणौन स्वकीय लेखन करीत गेले पाहिजे विशेष. तुम्ही पत्र पाठविले प्रविष्ट जाहाले व राजश्री बाबूराव साटम व राजश्री चिमणाजी कडू देशमुख आले. उभयेताचे वचनावरून व पत्रावरून शफतपूर्वक वेलभडारा पाठविला त्यावरून कलो आले. कोणेविसी सौशये न धरिता भेटीचा योग करावा म्हणून लि॥ त्यास येविसीचा करार करून तुम्हाकडेस उभयेता मारनुले पाठविले. येथे भेटीस निघोन यावयाचा संदेह किमपि नाही., तुम्हा लोकाचा भरवसा मानून निघावयाचा करार केला आहे. तयारी करीत आसो. लौकरीच भेटीचा योग घडत आहे. सौशये नाही. छ २० माहे रविलाखर बहुत काये लिहिणे लोभ असो दिल्हा पाहिजे. [ शिका ]

¶*Tulaji Angria deputes Baburao Satam and Chimnaji Kadu for meeting the addressee Javji Gault.*

याजकरितां बारा प्रहरा संध्याकाळापासोन उतार पडला आणिक येक रात्र १ खाऊन छ १८ साबानी लस्करसह वर्तमान पार आलो. पुढे कूच होऊन जात असों.. शेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Malharrao Holkar reports to Bhausaheb his return from Karnatak and the hardships he suffered from floods on the way.*

---

*No. 97*] [*22-5-1756*

**श्रीमोरया**

श्रीमंत राजश्री दादासा-
हेबाचे शेवेसी

विनंती शेवक मलारजी होलकर कृतानेक विज्ञापना. येथील कुशल वैशाख वद्य नवमी मुा मुधल घटप्रभातीर साहेबाचे कृपेकरून येथास्थित आसे विशेष. आम्ही आलियातागाईत तिकडील वर्तमान कळत नाही तर सविस्तर लेखन क(रा)वयासी आज्ञा केली पाहिजे. इकडील वृत मलप्रभेच्या मुक्कामीहून विनतीपत्रे पाठविली ते शेविसी पावली आसतील. तेथून दो मजलीनी मुकाम मजकुरास आलो. येथे नदीस पाणी याजकरितां मुकाम केला. सत्वरीच उतरून पुढे जाऊ. शेवसी श्रुत होये हे विज्ञप्ति.

¶*Malharji Holkar writes to Raghunathrao about his halt at Mudhol on the Ghataprabha.*

---

*No. 98*] [*2-6-1756*

**श्री**

श्रियाविराजित राजमान्ये
राजश्री नारोपंत नाना
स्वामीचे सेवेसी

पोष्ये विसाजी बाबूराव कृतानेक सां नमस्कार विनंती येथील क्षेम छ २ शवाल मुकाम मडकसिरे येथास्तित आसो विशेष. राजश्री श्रीनिवासराव व राजश्री राघो गंगाधर यासी राजश्री राव ममलकतमदार याही निरोप दिल्हा. पंत मशारनुलेस वस्त्रे व खर्चास व येक टांकन बसावयासी दिल्हा. मुलुगुदास राजश्री विठल विश्राम याजकडे जाऊन ठाणे मुलगुदचे व राजश्री हरिपंताकडे साडेबत्तीस हजार रुा साल दरसाल तनखा श्रीमंत स्वामीनी करून दिल्हा. त्याप्रमाने रुजुवात करून नागोजीराव पुनियास जातील. जासुदाचे रोजमरे तेरीख जाली, कृपा करून रोजमरा देविले पाहिजे. आमचा रोजमरा दीड माहीचा पाठविला पाहिजे.

---

१ एकजातीचा घोडा.

| | तैनात रुा | कापड | रुा आंख |
|---|---|---|---|
| बालकृष्ण आपाजी | ५०० | ० | ७५ |
| बालाजी कृष्ण दात्ये | ४०० | ० | ७५ |
| मल्हार प्रल्हाद | ४०० | ० | ७५ |
| * * र्जी केशव | ४०० | ० | ७५ |
| गोविंद बलाल | ३५० | ० | ७५ |
| भिकाजी माहादेव | ३५० | ० | ७२ |
| धोंडो मोरेस्वर | ३०० | ३० | |
| गणेश वामन | ३०० | १७ | |
| अंताजी नारायेण | २०० | ० | ५० |
| हरि नारायेण | १५० | ० | ४० |
| लक्ष्मण भिकाजी | २५० | ० | ५० |
| रामचंद्र गोविंद | ३२५ | ० | ७५ |
| गणेश रघुनाथ | २०० | २० | |
| रामाजी माणकेश्वर | २०० | १५ | |
| रावोबा नाईक भिडे पोतदार | २५० | २० | |
| कासी मोरेश्वर | २०० | १५ | |
| चिंतो आबाजी | १५० | १५ | |
| सदासिव नरसी | २०० | १५ | |
| * * * बाबूराव | २०० | १५ | |
| बालकृष्ण नारायेण | २०० | १५ | |
| हरि केशव | २०० | १५ | |
| गंगाधर विस्वनाथ | २५० | ० | ५० |
| जगनाथ भगवंत | २०० | २० | |
| सदासिव बापूजी सोनी | २०० | २० | |
| सदासिव कृष्ण | २०० | २० | |
| मल्हार चिंतामणी | ३०० | २५ | |
| शामराव गौतम | २०० | १५ | |
| बावाजी गोविंद | ३०० | २३ | |
| नारो कृष्ण जोरा हजिरी इमारत | ३०० | ० | ५० |
| भगवंत सामराज लकडखाना | ३०० | २५ | |
| शामजी खंडेराव * * | १५० | १५ | |
| | | 6921 | |

श्री

यादी खासगीकडील कारकुनाच्या तैनाता मुा सबा खमसेन मया व अलफ रु॥

| | तैनात रु॥ | कापड | रु॥ आंब |
|---|---|---|---|
| राजश्री जिवाजी गणेश व रघुनाथ सिवराम | ८४९७ | ० | १२०० |
| ८२०० तैनात देखील पालखी | | | |
| १६९ अपदागिरे ३ | | | |
| १३२ दिवट्ये ३ येकूण | | | |
| ८४९७ | | | |
| राजश्री गोविंद सिवराम | २६७३ | ० | १००० |
| २०० पालखी | | | |
| * ९ खासबारदार | | | |
| * * १० | | | |
| * * खिजमतगार | | | |
| * ९ दिवटे १ | | | |
| ५९ अपदागीर | | | |
| १५० दळाईत | | | |
| २०० नि॥ असामी ४ | | | |
| २६७३ | | | |
| नागेश सामराज | ७१० | ० | ७२ |
| ६०० तैनात | | | |
| ११० दिवट्या व पोरगा | | | |
| ७१० | | | |
| गोविंद चिंतामणी | ५१० | ० | ७२ |
| ४०० तैनात | | | |
| ११० दिवट्या व पोरगा | | | |
| ५१० | | | |

6920

| | तैनात रुा | कापड | रुा आंग |
|---|---|---|---|
| बालकृष्ण आपाजी | ५०० | ० | ७५ |
| बालाजी कृष्ण दात्ये | ४०० | ० | ७५ |
| मल्हार प्रल्हाद | ४०० | ० | ७५ |
| * * जी केशव | ४०० | ० | ७५ |
| गोविंद बलाल | ३५० | ० | ७५ |
| भिकाजी माहादेव | ३५० | ० | ७५ |
| धोंडो मोरेस्वर | ३०० | ३० | |
| गणेश वामन | ३०० | १७ | |
| अंताजी नारायेण | २०० | ० | ५० |
| हरि नारायेण | १५० | ० | ४० |
| लक्ष्मण भिकाजी | २५० | ० | ५० |
| रामचंद्र गोविंद | ३२५ | ० | ७५ |
| गणेश रघुनाथ | २०० | २० | |
| रामाजी माणकेश्वर | २०० | १५ | |
| रावोवा नाईक भिडे पोतदार | २५० | २० | |
| कासी मोरेश्वर | २०० | १५ | |
| चिंतो आबाजी | १५० | १५ | |
| सदासिव नरसी | २०० | १५ | |
| * * * बापूराव | २०० | १५ | |
| बालकृष्ण नारायेण | २०० | १५ | |
| हरि केशव | २०० | १५ | |
| गंगाधर विस्वनाथ | २५० | ० | ५० |
| जगनाथ भगवंत | २०० | २० | |
| सदासिव बापूजी सोनी | २०० | २० | |
| सदासिव कृष्ण | २०० | २० | |
| मल्हार चिंतामणी | ३०० | २५ | |
| शामराव गौतम | २०० | १५ | |
| बाबाजी गोविंद | ३०० | २५ | |
| नारो कृष्ण जोशी हुजिरी इमारत | ३०० | ० | ५० |
| भगवंत सामराज लकडखाना | ३०० | २५ | |
| शामजी खंडेराव * * | १५० | १५ | |

6921

| | तैनात रुा | कापड | रुा आंख |
|---|---|---|---|
| दादो गोविंद लकडखाना | २०० | १३ | |
| केसो कृष्ण लकडखाना | २७५ | २० | |
| भिमाजी खंडेराव इमारत | २०० | २० | |
| बाळकृष्ण विठल लकडखाना | १७५ | १५ | |
| भिकाजी जिवाजी इमारत | १२५ | ५ | |
| गोविंद बापूजी इमारत | ३०० | ३० | |
| लक्षुमण विस्वनाथ इमारत | ३०० | ३५ | |
| मोरो बापूजी लकडखाना | २०० | ० | |
| बाबूजी बलाल लकडखाना | २०० | ० | |
| बाजी बाबूराव पर्वती | ३०० | २० | |
| नारो कृष्ण बाग बंगला | १५० | ० | |
| गोविंद माहादेव बाग पर्वती | १३२ | ० | |
| कृष्णाजी गोपाल बाग वाई | १७५ | १५ | |
| वासुदेव विठल रमणा | १२० | १० | |
| सदासिव विष्णु बानवडी | ३०० | ७ | ६० |
| भिवाजी नारायण वडगांव | १७५ | १५ | |
| सदासिव कृष्ण मोतीबाग | १७५ | ११ | |
| सदासिव कृष्ण माणिकबाग | १५० | ११ | |
| रामाजी गणेश दारूखाना | ३२५ | २५ | |
| दामोदर रामचंद्र दारूखाना | २०० | ० | |
| बाळाजी जिवाजी पागा खासगी | १२५ | १५ | |
| गोपाळ बाबाजी सिकारखाना | २०० | १५ | |
| विष्णु माहादेव रथखाना | २०० | २० | |
| सदासिव बापूजी जोसी लकडखाना | १७५ | १२ | |
| गोपाळ मोरेश्वर वहीतकोठी | २७५ | २० | |
| माणको तुकदेव देव शुक्रवार | २०० | १३ | |
| | २५७६१ | ७०० | |

| | | तैनात रुा | कापड | रुा आंख |
|---|---|---|---|---|
| * * * आसामी नेमणुकेन आहेत तूर्त चाकरीवर नाहींत रु. | | ७५० | ० | |
| २५० विसाजी बलाळ | | | | |
| २५० हरि गणेश | | | | |
| २५० विसाजी रघुनाथ | | | | |
| ७५० | | २६५१७ | ७०० | . |
| महादाजी विस्वनाथ निा कामाठी | | २०० | ० | ४० |
| | | २६७१७ | ७०० | ३२१२ |

¶*This is a list of clerks, their remuneration and servants they were allowed to entertain at Government expense.*

---

*No. 100*] [*14-2-1757*

श्री

तीर्थरूप राजश्री नाना वडिलांचे
सेवेसी

आपत्ये सगुणेने नमस्कार विनंती. येथील क्षेम ता माघ वद्य १० पावेतो मुा काल्पी उतरतीर वडिलाचे आर्सीवादे सुखरूप पावलो विशेष. बागलकोट येथील मुकामीहून पौष शुध त्रितीयेचे पत्र लिहिले ते पावोन समाधान जाहाले. यैसेच सदैव पत्र ल्याहावयासी आज्ञा करीत असिले पाहिजे विशेष. रेवातीर हांडे येथील मुकामीहून वडिलास पत्र लिहिले त्यावरून विदित जालेच असेल. त्याउपरात मजल दरमजल झांसीस आलो. नारो शंकर भेटले. च्यार दिवस तेथे राहोन दरमजल काल्पीस माघ वद्य पंचमीस आलो. राजश्री गोविंद बलाल व हरि विठल भेटले. उदईक निघोन दरमजल प्रयागास जाऊ. परदरबारचे कागदपत्र आणावयाविसी गोविंद बलाल याचे जासूद गेले आहेत व वडिली कागद लेहून दिल्हे ते पहिलेच रवाना केले. परंतु जाबसाल आले नाहीत, यास्तव उदईक निघोन ब्रह्मावर्तास भागिरथीतीरी दरमजल जाऊ. सिवरात्र तेथेच होईल, तो परदरबारी कागदहि येतील. उपरांत पुढे जाऊ. प्रयागी काही गडबड जाहाली आहे, यास्तव गोविंद बलाल व हरि विठल प्रयागपावेतो येतील. सर्वाकडील वकील व कागद आल्यानंतर गोविंदपंताचा पुत्र समागमे घेऊन त्यास माघारे जावयासी निरोप देऊ. गोविंदपंताचे चिरंजीव कासीपावेतो येतील.

वरकड वर्तमान पेशजी दिलीहून अलीअसकरखान कुंवरा दाहा हजार फौज व पंधरा हजार प्यादा घेऊन अंतर्वेदींत येऊन दंगा बहुत केला. हे वर्तमान गोविंद बलाल यास कळताच हरि विठल यास समागमे घेऊन फौजसुधा इटावे यानजकि गाठ पडली. ते समई प्रहर येक युध्य बहुत जाहाले. मोगल तो भारीच होता. हरि विठलं यानी फारसी मर्दुमी केली. मोगल मोडून लुटून पस्त केला. पुत्रसहवर्तमान मारून सर्व फौज मारिली व कितेक लुटिले. ज्याणी युध्य पाहिले ते हरि विठल याची तारीफ गोविद बलाल देखील करितात. या प्रांतात हरि विठल याचा नक्ष बहुत आहे. वडिलास कळावे म्हणौन लिहिले असे. बहुत काये लिहिणे हे विनंती.

*¶Sagunabai from Kalpi on her way to Benares writes to Nanasaheb Peshwa about a severe action that took place between Hari Vithal and the imperial forces under Ali Askarkhan in which the latter was killed and his force routed.*

---

*No. 101]* *[13-8-1757*

श्री

श्रीमत राजश्री भाऊ स्वामीचे

सेवेसी

विनती सेवक शंकराजी केशव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागायेत छ २७ जिलकादपावेतो ये प्रातीचे व सेवकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष. माहाराज राजश्री शंभु छत्रपति स्वामी यांणी आज्ञापत्र वा अलीखान व नाईकजी निकम हुजरे यासमागमे पाठविले तेथे नाहस्थानेचा प्रात बिदनूरचे दक्षणेकडील तहद कलीकोटपावेत घाटाखाली दर्याकिनारा मुल्क आहे तेथील सवस्थानीक सावरी राजा कलिकोट व येळ राजा सवस्थान पुवावर हे दोघे सखे बंधू. याचेच दुसरे ठेवणाईत चौघेजण याच्या राज्यात तेहि राजे म्हणवितात. परंतु मातबर उभयता बंधू लिहिले आहे. हे चौघेजण आहेत. ते या उभयताचे हुकुमतीत आहेत. त्यास याचा मुल्क बिदनूरकर राजा बुदी बसापा नाईक याणी काही मुल्क घेतला आहे. सदरहू राज्यास मानीत नाही. याजकरितां हे राजकारण स्वामीकडे याणीच सांगोन पाठविले, त्यावरून करवीराहून हुजरे दोघेजण दाखला पाहावयास रवाना केले. यांणी जाऊन उभयता बंधू राजे व दुसरे चौघे यांची भेट घेतली. त्यास त्याणी सांगितले की अरमार व लस्करची फौज आली तरी आपण सामील होऊन हा मुल्क सोडऊन जे खावंद नेमून देतील ते घेऊन. लस्करची फौज आली तरी बिदनूरचे राज्य सोडऊन. लस्करची फौज आली तरी अरमारात भारी जमाव पाईचा आला तरी बंदरकिनारा

अरमार येता सामील होऊन. बंदरकिनारा मातबर गाव आहेत, तेथे पैदास्त करून देऊन, यैसी त्याची बोली आहे. यप्रा हे उभयेता सागता त्यास स्वामीचे आज्ञापत्र आले तेच या उभयतासमागमे देऊन सेवेसी पाठविले आहेत. स्वामीनी हे वृत मनास आणून राजश्री आणापाहि तिकडील माहीत आहेत. त्यासहि पुसावे व याजबा दाखल्यास शाहाणे माणूस देऊन सा सवस्थानिकास सा पत्रे देऊन दाखला पाहावा. तेथील दाखला पाहून आलि(या)वर राजकारण ठीक असल्यास स्वामीच्या चितात येणे ते येईल त्यासारिखा विचार कर्तव्य तो स्वामी करितील. राजश्री स्वामीच्या पत्राचे उतर लेहून आलाहिदा पाठविले आहे. स्वामीचे विचारास येईल तरी पाठवावे * * * विदित जाहाले पाहिजे हे विज्ञापना.

¶*Shankaraji Keshao reports to Bhausaheb a dispute between the Raja of Bednore and the Sabari Raja of Kalikot (Calicut) and his brother, in which the intercession of the Pethwa is sought.*

---

*No. 102]* *[9-11-1757*

श्री

राजश्री रावजी स्वामीचे सेवेसी

विनंती येथील वर्तमान ता छ २६ सफर सायंकालपर्यंत यथास्थित असे विशेष. आज राजश्री रावोपंत भाऊस बोलाविले होते. त्यास उदईक पातशाहाकडेस जाण्याचा निश्चय आहे. पातशा विवकराव नानाचे पलीकडे आहे. त्याचाहि खोजा दादास बोलावयास आला होता. उदईक जाणार असा निश्चय आहे. मुरादाबादेस कृष्णरावजी आहेत. त्यास राजारामपंताचे त्याचे बनत नाही. त्याचेहि प्रकरण येथे पडले आहे. कोणाकडे ठरेल तसे लेहू. मुज्यातदौले याजकडून भवानी शंकराचे पत्र आले तेच बजिनस पा आहे त्याजवरून सर्व कलेल. तेथील खडर्णाचा यैवज कितीक आजपर्यंत वसूल जाहाला हे ल्याहावे. येथेहि दादा पुसत होते. बहुत काय लिहिणे लोभ करीत असिले पाहिजे हे विनंती. बालाजी खडेराव यास गंगेस पूल बांधावयास रवाना केले. आज निघोन गेले. जाटाकडील दयारामहि वगैरे दिल्हा आहे. हे विनंती.

¶*The writer mentions the names and movements of the persons that took part in Raghunathrao's campaign of Delhi in 1757 and that were responsible for the collection of tribute from the Doab.*

No. 103] [1758?

# श्रीभार्गव

मसुदा गंगाधर येसवंत दि॥ रा॥ मल्हारजी होळकर यांस सरकारचे पत्र कीं, त्रीज्यागड सरकार प्रा॥ खरगोण येथे पवाराचे मोकासे आहेत. त्यास मोकास-बाबेचा यैवज कचेरीस सुदामत सरकारचे कमाविसदार पवारास देत आसतात त्याप्रोाच ते सालाबाद घेत आसतात. साल मजकुरी पवारानी आपल्या आम-लाच्या सनदा राजश्री मल्हारबाकडे दिल्हा. मल्हारबानी आपले तर्फेने कमाविस-दार प्रगणियांत मोकासबाबेच्या आमलावर पाठविले ते हस्तबुद आमल करणार म्हणून हजूर वर्तमान विदित जाले. यैसियासी पवाराचे आमलाचा मजकूर तीर्थरूपाजवळी यंदा लस्करात पडिला होता ते समई तीर्थरूपानी ताकीद केली कीं सुदामत ज्याप्रो॥ यैवज पावत आला आसेल त्याप्रो॥ घेत जाणे म्हणून. यैसे आसता तुम्ही पवाराकडून सनदा घेऊन हस्तबुद आमल करावा हे गोष्ट कार्याची नाही व पवारानी तुमची हिमाइत करून आमल सुधारावा यातहि त्याचे कल्याण नाही. जे करणें तें त्यानी हजरूनच रदबदली करून करावें हेंच त्यांस उतम आहे व तुम्हीहि त्याचे आमलास आव(?)विसी सुदामतची चाल मोडून जबर-दस्तीने सरकारचे आज्ञेसिवाय अमल बसवावा, हजूरच्या लक्षाखेरीज आणावा, हेहि उतम नाहीं. पवाराचे आगत्य कोणे रीतीचे आहे हे पुर्ते चितात आणून रा॥ मल्हारबास च्यार गोष्टी समजाऊन सागून सुदामतप्रा॥ पवार यैवज घेत ते करणें. यैथून मल्हारबास निषेधपुरसर पत्रीं ल्याहावें तरी ते सरदार, त्यास काय वाटेल यास्तव विशदार्थे लिहिले नाहीं. तुम्हास लिहिले आहे. याचा पुर्ता विचार व तीर्थरूपास पवारांचे आगत्यवाद किती हे मनन करून मल्हारबा त्याप्रो॥ वर्तणूक करीत व आपले तर्फेचे कमाविसदार व राऊत बरकंदाज माहालातून उठून नेत ते करणें. मल्हारबा सरकारचे मर्जीप्रो॥ वर्तत ऐसा बोध तुम्ही त्यास करावा तो करीत नाही, यावरून तुम्हास काय म्हणावे? अत:पर तरी लिहिला आन्वय ध्यानास आणून हजूरचे मर्जीप्रा॥ वर्तत ते करणे म्हणून पत्रे. येविसीचो कारभारसंमधाचा मदार सर्वहि तुम्हावर आहे. ही गोष्ट उगीच तुम्ही जबर-दस्तीनें केली. तुम्हास परिछिन्न शब्द लागेल. खावंदाचे मर्जीची रीत तुम्हास सर्वहि कळतच आहे. यास्तव विशदे तुम्हास लि॥ असे, आणि लि॥ प्रो॥ तुम्हास जरूर केलेच पा॥ करणे.

¶*This is a draft of a letter addressed to Gangadhar Yashvant from Poona in order to compose the differences between Pawar and Holkar regarding the mokasa dues of the former. The letter shows that Malharrao Holkar was defying the central authority of the Peshwa even in the regime of Balajirao.*

१ हा मजकूर मूळ मसुद्यांत ... लेला आहे. २ या पुढील मजकूर त्र्यंबकराव मामाच्या हातचा. पत्राच्या मसुद्यांतील मजकुराशी मत... लक्षांत घेता पत्रलेखक रघुनाथराव असावा असें स्पष्ट दिसतें.

No. 104| |4-1-1758

श्री

श्रीमंत राजश्री बाबासाहेब
स्वामीचे सेवेसी

सेवक मुकुंद श्रीपत साष्टांग दंडवत विज्ञापना येथील क्षेम ता। छ २३ रविलावर पावेतो स्वामीचे कृपेकडून सेवकाचे व प्रांत मजकूरचे वर्तमान यथास्थित असे विशेष. पेशजी नंजराज सर्वाधिकारी याजकडील संदर्भ व त्याचे पत्रे हुजूर रवाना केलीच आहेत त्यावरून श्रुत जाहलेच असल. करारनामा नंजराज याजकडील समर्पक याला आणि फौजेच खर्चास बेगमी व्हावी तेव्हां खातरजमा होऊन कार्यभागी प्रवर्ताचा भाव श्रीमंताचे आज्ञापत्री पेशजी दर्शविले त्याप्रा। मोहरनसी करारनामा समर्पक लेहून सेवकाचे नावी राजेच पत्र व कारभारी यानी लेहून पाठविले आहेत. हली करारनामा येथे ठेऊन त्याचे नकल व सेवकाचे नावी अली पत्रें दोनी बजिनस पाठविली आहेत. श्रीमंताचे सेवेसी हे मजकूर लि।। आहे. स्वामीनी सविस्तरे श्रुत करून कार्यभाग विवेक करून देऊन करार प्रा। अमल मुलुकांत बैसवणेस जलद योजावें. कारभाऱ्यानीं सेवकाचे नावी लिहिली पत्रे मावार। पाठवावी. सारांष, मातबर माणुसास वचन दिल्हेवर तेही येथून लिहिल्याप्रा। करारनामा फौजेचे खर्चास लिहिणे ते लिहिले आहेत. त्याचे पत्रावरून चितास आणून जलद कुमक पोहचाऊन स्थापना करणेस स्वामी समर्थ असा. कडपेकडील फौज येथे येणेविसी दोन तिनीदा लेहून पाठविले, परंतु तिकडे बसालतजंगाचा शेह पडला होता त्यावरून त्याचे येणे न जाहले. हली बसालतजंग (फाटले * * ) कडे जाणार आहे. आता ही टाकोटाक लिहिले आ (फाटले * * * ) तरी घोरपडेकडील फौज आणऊन राजकार (फाटले * * * ) मनसुबा केला आहे; परंतु हाताखाले फौज (फाटले * * ) चितायोग्य कार्यभाग घडत नाही. स्वामीनी या कार्यात मन घालून तूर्त पांच हजार छेडी फौज जलद रवाना करावी. बहिरबुनगा मात्रे येणार येतील आणि घोरपडेचे नावी व राजश्री महिपतीराव कवड्याचे नावी ताकीदपत्रे पाठऊन जलदीने राजकारण गाठी पडे येसे केले पाहिजे. वरकड अर्थ श्रीमंताचे पत्री लि।। आहे त्यावरून श्रुत होईल. या कार्यास आपले आगमन दरमजल बारा चौदा कोस येणे प्रा। जाहलिया बहुतच विशेष होईल. कदाचित आलस्य होऊन उपेक्षाखाले घातलिया नजराज थोर माणूस त्याचे हातास लागणार नाहीं, कार्य बिगडल. येसे संदर्भ येणार नाहीं. यावरी आपले चितास येईल त्याप्रा। होईल. हे राजकारण काही लहान नव्हे, मातबर राजकारण

No. 103] [1758]

## श्रीभार्गव

मसुदा गंगाधर येसवंत दिा रा मल्हारजी होळकर यांस सरकारचे पत्र कीं, श्रीज्यागड सरकार प्रा खरगोण येथे पवाराचे मोकासे आहेत. त्यास मोकासबाबेचा यैवज कचेरीस सुदामत सरकारचे कमाविसदार पवारास देत आसतात त्याप्रोच ते साल्लाबाद घेत आसतात. साल मजकुरी पवारानी आपल्या आमल्याच्या सनदा राजश्री मल्हारबाकडे दिल्ह्या. मल्हारबानी आपले तर्फेने कमाविसदार प्रगणियांत मोकासबाबेच्या आमलावर पाठविले ते हस्तबुद आमल करणार म्हणून हजूर वर्तमान विदित जाले. यैसियासी पवाराचे आमलाचा मजकूर तीर्थरूपाजवळी यंदा लस्करात पडिला होता ते समई तीर्थरूपानी ताकीद केली कीं सुदामत ज्याप्रो यैवज पावत आला आसेल त्याप्रो घेत जाणे म्हणून. यैसे आसता तुम्ही पवाराकडून सनदा घेऊन हस्तबुद आमल करावा हे गोष्ट कार्याची नाही व पवारानी तुमची हिमाइत करून आमल सुधारावा यातहि त्याचे कल्याण नाही. जे करणे ते त्यानी हजरूनच रदबदली करून करावें हेंच त्यांस उतम आहे व तुम्हीहि त्याचे आमलास आव(?)विसी सुदामतची चाल मोडून जबरदस्तीने सरकारचे आज्ञेसिवाय अमल बसवावा, हजूरच्या लक्षाखेरीज आणावा, हेहि उतम नाहीं. पवाराचे आगत्य कोणे रीतीचे आहे हें पुर्ते चितात आणून रा मल्हारबास च्यार गोष्टी समजाऊन सागून सुदामतप्रा पवार यैवज घेत ते करणें. येथून मल्हारबास निषेधपुरसर पत्रीं ल्याहावें तरी ते सरदार, त्यास काय वाटेल यास्तव विशदार्थ लिहिले नाहीं. तुम्हास लिहिले आहे. याचा पुर्ता विचार व तीर्थरूपास पवारांचे आगत्यवाद किती हे मनन करून मल्हारबा त्याप्रो वर्तणूक करीत व आपले तर्फेचे कमाविसदार व राऊत बरकंदाज माहालातून उठून नेत ते करणे. मल्हारबा सरकारचे मर्जीप्रो वर्तत ऐसा बोध तुम्ही त्यास करावा तो *करीत नाही, यावरून तुम्हास काय म्हणावे? अत:पर तरी लिहिल्या आन्वय* ध्यानास आणून हजूरचे मर्जीप्रा वर्तत ते करणे म्हणून पत्र. [2] येविसीचो कारभारसंमधाचा मदार सर्वहि तुम्हावर आहे. ही गोष्ट उगीच तुम्ही जबरदस्तीने केली. तुम्हास परिछिन्न शब्द लागेल. खावंदाचे मर्जीची रीत तुम्हास सर्वहि कलतच आहे. यास्तव विशदे तुम्हास लिा असे, आणि लिा प्रो तुम्हास जरूर केलेच पा. करणे.

¶*This is a draft of a letter addressed to Gangadhar Yashvant from Poona in order to compose the differences between Pawar and Holkar regarding the mokasa dues of the former. The letter shows that Malharrao Holkar was defying the central authority of the Peshwa even in the regime of Balajirao.*

१ हा मजकूर मूळ मसुद्यांत [?] केला आहे. २ या पुढील मजकूर त्र्यंबकराव मामाच्या हातचा. पत्राच्या मसुद्यांतील मजकुरा[?] मत्[?] लक्षांत घेता पत्रलेखक रघुनाथराव असावा असें स्पष्ट दिसते.

6926

होते, त्यासी विलंब लागला. छ १६ व छ १७ मुकाम केला. छ १८ कूच करून उमरावतीपुढे दो कोसावर नागपूरचे वाटेवर मजल केली. वाटेस त्रिंबकराये रगोपत वकील व येक साडनीस्वार येऊन भेटले. छ १९ मुकाम करून पत्रे सांडनीस्वार त्याजवळी गेली. साईकाळी कृस्णाजी मोरेस्वर आले. रात्रौ राज्याजीची भेट जाली. छ २० जावल मुकाम जाला. कृस्णाजी मोरेस्वर सलुकाचा गौवसाल करून च्यार घटका दिवस राहता स्वार होऊन गेला. छ २१ जावली प्रहर दिवस चढता येनार. सलुक होनार ऐसे दिसते. पहिले सिकाकोलाकडील राजे याची पत्रे आली होती, त्यावरून धोंडाजीपंत आपले तरफेने ब्राम्हन पुढे पाठविला की आपन मागून येतो. तुम्ही आपला बंदोबस्त ठेवने, आनीव (?) फौज पुढे येऊन आमसी भेटने विशप विज्ञाती सामा.

¶*This paper refers to the movements of Janoji Bhonsle and of the Nizam towards Kholapur. Can this refer to the war between them in 1758 when Ibrahim Khan Gardi took the side of the Nizam, after Bussy had departed.*

---

*No 106*] [*3-3-1758?*

## श्रीराम

छ १५ जाखरी दो प्रहरा रात्रौ राजे विठ्ठलदास जानोजी भोसले याची भेटी घेऊन आले. पैसे निवाल्याचे मध्यस्थ कृष्णाजी गोविंदे व कृष्णाजी मोरेस्वर आले त्यासमईच जाणोजीची कुल फौज तयार होऊन मुधाजी भोसले साता कोसावर त्यासी मदत आले होते त्यावर छयापा घालायानिमित्य धावले. वहीर व हती वगैरे सरंजाम हती लागला. फौज लुटली. काही पलाली. खुद मुधाजी दिढाशा स्वारासी निघू गेला. छ १६ जाखरी नवाब कूच करूण नागपुरची वाट सोडून कारजयाचे रोहके दोन कोस येऊन उतरले. छ १७ व छ १८ दो कुच्याणे वरधेचे काठास आले. छ १९ जाखरी मुकाम केला. त्याची फौज रघोजी कराडे याचे हतीसमेत निशान घेऊन गेला. म्हनऊन मुधाजीचे मागे लागली. काही फौज फिरली. रघोजी मागेच होता. मुधाजीने जातीने व पागेचे लोकानसी हल्ल्या करूण केला. बहुत जाया केले. मुधाजीस भाला वरचेवर लागल्याची वार्ता आहे. लोकाचे कबिले बहुत धरूण आनिले. रघोजी कराडिये आपले निशान घेऊन आले. राणोजीची फौज याचे फौजेपासून दो कोसावर येऊन उतरली. दिवस उतम नवते म्हणून छ २२ जाखरी च्यार घटका दिवस राहाता इब्राहीमखां व राजे विठलदास जाऊन घेऊन आले.

---

१ भास्कररामाचे स्त्रीचा वकील.

आहे, परंतु निकटीवरून राजेनें करारनामा समर्पक करून पाठविला आहे. आपण आल्यास हे यश आपले पदरी येणेस सौशय नाहीं. संविस्तर विनंती श्रीमंताचे पत्रीं लिा आहे त्याजवरून विदित होईल. ज्याप्रमाणे सन समानांत यश घेऊन गेला त्यापेक्षां लक्ष वाच्यानें हे समई स्वामीचे पदरी महद यश येऊन कीर्तीस पात्र होता खासा स्वारीच आपली जाहलीयास फार उतम आहे कदाचित काही गुता असेल तर पाच हजार फौज सडी आम्हाकडे चांगली पाठवावी. हैदर नाईकाचे पारपत्ये होऊन स्वामीस यश येई हाच प्रकार होईल. हरविलाजे फौज पाठवावी. सेवकाचे नावे नजराज्याची पत्रे आली ती व करारनामीयाची नकल पाठविली आहे. पाहून माघारे पाठविले पाहिजे. वहुत काय लिा लोभ असो दीजे हे विज्ञापना.

¶*Mukund Shripat communicates to Balwantrao Mehendale the result of his negotiations with Nandraj of Mysore and asks the addressee to come up with his forces to execute the proposed plans.*

---

*No. 105*] [*17-2-1758?*

छ ८ जमादिलाखर

## श्रीराम

छ ८ जावली रात्रौ बारा बान बावर्लीचे नदीचे बेदाडाचे आसन्यानें सैन्यावर टाकिले, परंतु कोन्ही जाया न जाले. तोपाची मार जाली. छ ९ जावली कूच करून माहोलीपुढे चौ कोसाची मजल केली. उतरतेसमई पिछ्याडी व उजवे बाजूकडे फौजा नमूद जाल्या. यानीहि तोफाची मार दिधली. छ १० जावली कूच करून खोलापुरास आले. उतरतेसमई गावापलीकडे फौजा नमूद जाल्या. साईकाळपावेतो उभ्या होत्या. तोफाची मार जाली. छ ११ जावली खोलापुरी काहीं पैका घेयाचा यास्तव मुकाम केला. छ १२ जावली कूच करून कोसावर येऊन उमरावतीचे वाटेवर मजल केली. प्राथकाळी सलुकाचे जौबसालानिमित्य रगोपंत वकील जानोजीचा आला होता. उतर प्रतिउतर करून मागती गेला. छ १३ जावली कूच करून कसबे मातकुळीपुढे आधकोसावर येऊन उतरले. फौजा कोन्ही आल्या नाही. पनास स्वार आले होते. त्याची दोन घोडी मारून आनिली. छ १४ जावली कूच करून उमरावतीस डेरे केले. प्राथकाली सांडनीवा॥ पत्रे आली की फडच्याचे जौबसाल लिहून त्रिंबक शंकर मनसबदार यासी पाठवने. यानी लिहून पाठविले, दुरूंन जौबसाल काये होनार ! आम्ही उमरावतीवर येतो. तुम्ही कोन्हीं मातबर पाठवने. त्यावरून छ १५ जावली मुकाम केला आनी त्रिंबकरायासी पाठविले. त्याची फौज मागे कोलापुरावर

होते, त्यासी विलंब लागला. छ १६ व छ १७ मुकाम केला. छ १८ कूच करून उमरावतीपुढे दो कोसावर नागपूरचे वाटेवर मजल केली. वाटेस त्रिंबकराये रंगोपंत वकील व येक सांडर्नास्वार येऊन भेटले. छ १९ मुकाम करून पत्रे सांडनीस्वार त्याजवळा गेली. साइंकाली क्रस्णाजी मोरेस्वर आले. रात्रौ राज्याजीची भेट जाली. छ २० जावल मुकाम जाला. क्रस्णाजी मोरेस्वर सलुकाचा नोबसाल करून च्यार घटका दिवस राहता स्वार होऊन गेला. छ २१ जावली प्रहर दिवस चढता येनार. सलूक होनार यैसे दिसते. पहिले सिकाकोलाकडील राजे यांची पत्रे आली होती, त्यावरून धोंडाजीपंत आपले तरफेने ब्राम्हन पुढे पाठविला की आपन मागून येतो. तुम्ही आपला बंदोबस्त ठेवने, आनीब (?) फौज पुढे येऊन आमसी भेटने विशष विज्ञाती सामा.

¶*This paper refers to the movements of Janoji Bhonsle and of the Nizam towards Kholapur. Can this refer to the war between them in 1758 when Ibrahim Khan Gardi took the side of the Nizam, after Bussy had departed.*

---

*No. 106*] [*3-3-1758?*

## श्रीराम

छ १५ जाखरी दो प्रहरा रात्रौ राजे विठलदास जानोजी भोसले याची भेटी घेऊन आले. पैसे निघाल्याचे मध्यस्थ कृष्णाजी गोविंदे व कृष्णाजी मोरेस्वर आले त्यासमईच जाणोर्जीची कूल फौज तयार होऊन मुधाजी भोसले साता कोसावर त्यासी मदत आले होते त्यावर छापा घालायानिमित्य धावले. बहीर व हती वगैरे सरंजाम हती लागला. फौज लुटली. काही पलाली. खुद मुधाजी दिढाशा स्वारासी निघू गेला. छ १६ जाखरी नवाब कूच करूण नागपुरची वाट सोडून कारंजवारिचे रोहके दोन कोस येऊन उतरले. छ १७ व छ १८ दो कुच्याणे वरधेचे काठास आले. छ १९ जाखरी मुकाम केला. त्याची फौज रघोजी करांडे याचे हतीसमेत निशान घेऊन गेला. म्हनऊन मुधाजीचे मागे लागली. कांही फौज फिरली. रघोजी मागेच होता. मुधाजीने जातीने व पागेचे लोकानसी हरेन्या करूण केला. बहुत जाया केले. मुधाजीस भाला वरचेवर लागल्याची वार्ता आहे. लोकाचे कबिले बहुत धरूण आनिले. रघोजी करांडिये आपले निशान घेऊन आले. राणोर्जीची फौज यांचे फौजेपासून दो कोसावर येऊन उतरली. दिवंस उत्तम नवते म्हणून छ २२ जाखरी च्यार घटका दिवस राहातां इबराहीमखां व राजे विठलदास जाऊन घेऊन आले.

---

१ भास्करामाचे लीचा वकील.

जाणोजी भोसले व रवोजी करांडिये नऱ्होंजी जाचक व पिराजी निंबालकर वगैरे सरदार समागमे होते. गिरमाजी खंडेराऊ आले नाहीत. भेटी जाल्या. चार घटका रात्रपावेतो खिलवतेमधे होते. येक हती व येक घोडा व वस्त्रे व जिगा व सरदेच जवाहर दिधले. स्वार होऊन आपले डेन्यास स्वार होऊन गेले. उदईक नवाब त्यांचे भेटीस जातील. परवा येथून कूच होणार. आकोल्यामधे बहीर व आसबाब ठेविला होता व महालचे लोक होते त्या च्यार आसाम्या आनविल्या. मुधाजी भोसले चांद्याआलीकडे वन परगनियात आहेत. मागती जमाव करितो. बहीर व नुकसान थोडी मात्र गेली. भल घोडिये (!) कूल निघून गेले. उभयेताचा कल्ह निर्मान जाला. मुलकात धूम करील यैसे दिसते. नवाब सलावतजंग भा(गा)नगरीस लागले. हे वर्तमान आहे. विशेष विज्ञसी सामा (!)

¶*This appears to be a report of the fighting that was going on between Nizam Ali and the Bhonsle brothers in 1758 or thereabout.*

---

*No. 107*] [*26-11-1758*

श्री

श्रीमत राजश्री बलवंतरावजी
स्वामीचे सेवेसी

पोष्य रामचंद्र बाबाजी कृतानेक साष्टांग दंडवत प्रणाम विनंती उपरी येथील कुशल ता। छ २४ रबिलवलपर्यंत यथास्थित असे. याप्रांते चहूकडे बिखाडा फार जाला. माझे जिमेस च्यार जोडा मातबर आहेत. लोकाची भरती आपली आपणास विदितच आहे. याकरितां हे सोडून फक्त हिसेबाचे मखलासीकरितांच आपणांकडे यावें हे गोष्टी विचाराची नव्हे. म्हणून या विचारांत असतां आपण हुजूरची आज्ञा पाठविली की, रसदेचा यैवज व मखलासीस कारकून पाठवणे. त्यावरून चिरंजीव विठोबास सेवेसी पाठविले आहेत. मायबापपणे जो साभाल करणे तो करावा. पटणप्रांते अलीकडे फारच गडबड जाली. राजश्री सिवाजी थोरात याजकडील लोकांचा ब्रम्हसमुद्रचे ठाण्यात गलाठा जाला. सेपनास घोडे गेले. अलीकडे त्याणी आणविल्याप्रमाणे येथून प्यादे थोडेबहुत पाठविले आहेत. हाली आणिखी प्यादे त्याणी आणविले आहेत. परंतु येक प्यादा मिलत नाही. बिदरूरचा राजा खरा म्हणोन बिदरूर प्रांतचे हजारपर्यंत लोक येऊन आणिखी प्यादे ठेऊन हरपनहलीकर मिलोन बिदरुरास निघाले आहेत. हे वर्तमान पेशजीहि लिहिले आहे व हाली सविस्तर राजश्री महिपतराव दादा यांचे पत्री विस्तारे लिहिले आहे त्यावरून विदित होईल. साराष प्यादा तिकडे वोढ पडिली. येक प्यादा

कोठेहि मिळेना आणि चहूकडे अनाहुत जाले आहे. बागूरची खेडी होसदुर्गकरांनी घेतली आहेत. ती सोडीत नाहीत. बरकड कसबा व खेडी याची गत काय ते आपण पाहिलीच आहे. नित्य तेथील काचणी लागली आहे. आपले आगमनाची प्रतीक्षा लागली आहे. ऋणानुबंद प्रमाण. प्रस्तुत वर्तमान येकिले की, सावनूरकराचे वकील रदबदली करितात. त्यावरून काही द्रव्य घेऊन रटेहली त्यास देणार म्हणून बदंता. त्यास हे गोष्ट तो सहसा घडणार नाही, कां जे रटेहाली जागा नामी आहे. तेथे सरकारचे निशाण झेडा कायम जाला तो उतरून ब्रम्हहत्यार त्याचें निशाण तेथे चढेल हे गोष्ट काय घडणे आहे. त्याहीमधे तेथें ईश्वरस्थान कर्दंबेश्वर म्हणून देवस्थान अपूर्व आहे. त्या देवालयांत सेंभर वरशाअलीकडे दीपाराधना होऊ लागली आहे. तेथे पुनरुक्त यथापूर्व रीतीस कसे यईल? त्यात रटेहली दिगर जागीर बलात्कारें आपलीं पोटे भरावी म्हणून यका दोवानीं सावनूरकरांचे तंत्रेत भिडविली होती. अन्यथा त्यास काय प्राप्त होती ते शोध घ्यावा. गतवर्षी जेव्हा सलाबतजंगासी बिघाड जाला त्या हंगाम्यांत सावनूरकरानी नजर फिराऊन हरिहरावरी बदनजर धरिली होती. हरिहरची पेठ तमाम गुल्हे जाले होते. मग तेच फौज रटेहलीचे गळा पडिली. मग आम्ही रटेहलीचे कुमकेस दोनसे प्यादे व पनास स्वार पाठऊन रटेहली राखिली व त्यांची फौज बुडावली. हा गुदस्ता या दिवसातील मजकूर असतां हाली रटेहाली सरकारांत आली असतां फिरून त्यास देणे हे गोष्टी परिछिन्नयुक्त दिसत नाही व मसलतीचाहि खर्च उगवला पाहिजे. याकरितां साभिमान धरून रटेहली देऊ न द्यावी. मुख्य गोष्ट आपण कृपा करितात. सलग चालवितात. म्हणून सलगीने लिहितों. कृपा करणार आपण समर्थ आहेत हे विनती.

¶*Ramchandra Bawaji reports to Balwantrao Mehendale the troubles that the Chiefs of Mysore and Bednore were raising in the newly conquered territory in the South. Later on he speaks of the inadvisability of giving back the strong outpost of Ratehali to the Nawab of Savanur.*

---

*No. 108]* *[27-11-1758*

पौ॥ छ १२ राखर सन तिसा

श्री

श्रीमत राजश्री पंतप्रधान स्वामी

चे शेवेसी

आज्ञाधारक सेवक रामचंद्र बाबाजी कृतानेक साष्टांग दंडवत प्रणाम विज्ञापना. स्वामीचे कृपादृष्टीकडून सेवकाचें वर्तमान ता॥ छ २९ रबिलवलपर्यंत

येथास्थित असे. अलीकडे आज्ञापत्र सादर जाले. तेथे आज्ञा कीं, सिरहटीकरांचा कज्या लागला आहे तरी तुम्ही राजश्री पुरुषोत्तमराव यांसी सामील होऊन त्यांचे पारपत्य करणे. त्यावरून त्यांकडे जावयाचे योजनेत सेवक आहे. प्यादांचा जथ काही जथरासारिखे जाले आहे. राजश्री गोपालरावजीनी हैदरनाइकास घेरलें आहे ते तसेच आहेत. पटणकरानी कडुराजवली ब्रम्हसमुद्र म्हणोन येक ठाणे होतें ते घेतलें. थोराताकडील से पंनास घोडे गेलें. थोरातानी आणविल्याप्रमाणे सेवकें प्यादे त्यांकडे रवाना केले आहेत. आणिखी पाठवावे म्हणून कारकून येथे येऊन बसला आहे. सेवक तलाश करीत असें. कडवाकडेहि प्यादे पाठविले. बागुरासहि सतत लागली आहे, तेथेहि भरती केली. बिदरूरचा राजा म्हणून गुंतुरांत ठेविला होता, त्याचें साद्यंत वर्तमान लिहून सेवेशी पाठविले आहे. अलीकडे हरपनहलीकरानी त्याचा पुर्ता शोध करून बिदरूरचे आवाजीस सांगोन पाठविले. यांचा निरोप जातांच आवाजीनीं या राज्याचे निसबतीचे लोक कितेक होते, त्यांस आणून कोण्हास जिवे मारिले, कोणाचे हातपाय काढिले. हरपनहलीकरास लिहिले कीं तुम्हास लक्ष होनपर्यंत देतो, त्यास हाताखालें घालोन मारून टाका. यैसे पत्र येतांच हरपनहलीकरानी आपले दलवाई व राजश्री चितामण आपासमागमे तीनसे स्वार व तीन हजार प्यादे देऊन गुतुरास पाठऊन राज्यास घेऊन बेलवडीस येऊन उतरले. राज्याची व त्यांची फौज मिलोन हजार बारासे स्वार व पांच हजार प्यादे इतकी आहे. जेजाला, बाण, दारूगोली सर्व सरंजाम आहे. सेवकें येथें उकडकत्रीस येऊन दोनेहलींत बिदरूरची फौज राजश्री दलवाई वीरभद्रपा व सबनीस कृष्णपया आहेत यांस सांगोन व लिहून पाठविले की, दोन महिनेपर्यंत तुम्हांस बरिचेवरी लिहून व सांगोन पाठवितो की, येक कोण्ही मातबर येऊन प्रमाणपूर्वक हालठिका (?) येसे सांगा म्हणिजे त्यास विचारें ठेऊन बंड मोडितों. त्यास तुम्ही येत नाही. हाली हरपनहलीकर त्यास घेऊन निघाले. अद्यापि तर्हीं तुम्ही यऊन पाहून जाणे. त्याणीं भेटीस येतों, हुजुरास त्यास घेऊन तुम्ही या, तेथें यतो आणि हालठिका म्हणोन सांगतो. तुम्ही त्यास मारावे ये गोष्टीस वीस हजार होनपर्यंत तुम्हांस देतों. याप्रों अंतस्त सांगोन पाठविले. सेवकें सांगोन पाठविलें, की मारणे हा यख्तीयार मजकडे नाहीं. तुम्ही येऊन खोटा म्हटलें तरी हे बंड मोडू. तुंम्ही येणे, राजाही बोलतो कीं, त्याणी येऊन समक्ष मजला पाहून ठिका म्हटले तरी ते क्षणीं मजला तुम्ही मारा. याप्रमाणें मजकूर आहे. प्रांतास काडीमात्र उपसर्ग नाही. हरपनहलीकर त्यांचे फौजेस कचेपके करून यास घेऊन बिदरूरास जानात. त्यांत मार्गात कसें होतें हे न कले. अगर तेथे गेल्यावरी कसें होतें ते न कले. जालें वर्तमान

सेवेशी लिहिले आहे. मागाहून जे होईल ते लिहून पाठवितो. सेवकें सर्व जागे ठाणीं बंदोबस्ती केली आहे. समागमें दाहाबारा प्यादानसीं येथें उकडकत्री खेडें रटेहली प्रांतचें येथें आहे. त्यास सावनूरकराचा वकील रा। व्यंकटराव म्हणून नेहमीं आजी दोन महिने सेवकाजवली येऊन बसला आहे. रदबदल करितात की, तुंम्ही पुरातन संभाजी माहाराजांचे वेलेचे आमचे मध्यस्त आहां. तरी हुजूर श्रीमंताचे सेवेशी कलेल तसी आमची रदबदल करून बंकापूर व रटेहली हे दोन्ही आमचे हातास येत ते करा म्हणिजे तुम्हांस मातवर कासाजी (?) देतो व येक गांव दरोबस्त देतों. याप्रमाणें रदबदल करितात त्यास हलीं सांगितले की, रटेहली द्यावी असा हुजूर करार जाला. सनदा येत आहेत. म्हणून मारनिलेनी सांगितलें त्यावरून सेवकास फारच विचार प्राप्त जाला आहे. आज्ञेप्रमाणें रटेहली सेवकें बहुत सायासें हस्तगत केली. स्वामिकार्य जाले. यामुळे धणी कृपालु होऊन सेवकाचे उर्जित होईल हा पूर्ण भरवसा असतां अकल्पित हे वार्ता येकिली. मनसुबियाचे विचारें पाहातां जेव्हा बकापूर सोडणे लागेल तेव्हा रटेहली सोडावी. अन्यथा रटेहली सोडावयाची जागा नव्हे. त्यामधें रटेहली काही सावनूरकराची नाहीं. किलेदार स्वतंत्र. ते जागा सरकारचा झेंडा कायम जाला असतां सरकारचे निशाण उतरून त्याचे निशाण चढावें हे गोष्ट या प्रांतात येक प्रकार दिसेल. मसलतीस खर्च पडला तो अद्यापि उगवला नाही. अखेर सालपर्यंत उगवणी होईल असा प्रकार आहे. सेवकाचा निभाव होयेसारिखी आज्ञा करणार स्वामी धणी मायबाप समर्थ आहेत. सेवेशी श्रुत होये हे विज्ञापना.

*¶Ramchandra Bawaji reports the intrigues of the Chief of Harpanhalli and one Awaji to do away with the rightful claimant of Bednore. He advises the Peshwa to reject the demand of the Nawab of Savanur for Ratehali which happens to be situated at a strategic point.*

---

*No. 109]* *[1-12-1758?*

पौ छ ११ रबिलाखर
ऊर्फ मार्गसीर्ष १४.

श्री

श्रीमंत राजश्री त्रिंबकपंतनाना
स्वामीचे सेवेसी

पोष्य शंकराजी केशव साष्टांग नमस्कार विनंति. येथील कुशल तागायत छ २९ रबिलावलपर्यंत येथास्थित जाणून स्वकीये कुशललेखन करावयासी आज्ञा केली पाहिजे विशेष. रामनगर व जवारकर व पेठकर व मुरगाणकर येकत्र

होऊन मुल्क मारितात व जाळितात; व दवणकर फिरंगी व रामनगरकर येक. येक जवारकरच आहे ऐसें नाहीं. हालीं सुलतानपूरनजीक नंदुरबार येथील दीड हजार कोळी रामनगरास आले. च्यार पांच हजार जमाव सिपाई व कोळी फत्तेपुरास जमा जाले, ते सत्वरच किले अर्जुनगड व इंद्रगड, बल्लाळगड व डाहाणू पावेत येणार. किले सेवग्यास रामनगरकराचा वेढा आहे. दारूगोळी दवणकर फिरंगी पाठवितो तो सर्वांस देतो, आणि परगणे खमेर पवार्डा व नेहरसंजाण व डाहाणू व वन्हे या प्रगणीयांची धूळ रामनगरकरानी मांडली आहे. तीन टोल्या केल्या आहेत. मुल्क जाळितात व सेतेंभातें उडवी जाळितात. येकी-कडे स्वारी कोल्यावर पाठवावी तर ते दुसरेकडे जातात. सारे खेळ दुर्जनसिंग याचे. सारे संस्थानिक याणी उचलिले आहेत. बळेच येऊन किल्यास वेढा देतात. याउपर इद्रगड अर्जुनगड या किल्याखाली येऊन बसणार हें वर्तमान तिकडून येका दोघानी लिहिलें आहे. फिरंग्यानें गोव्यास लेहून पाठविलें कीं अंशामवें : यावें. दवणकरहि ल्वाडीवर आला आहे. तेव्हां त्यास बल गोवेकरांचें असेल व जनचर्चा इंग्रेज फिरंगी येक. इंग्रेजाचा जमाव मुंबईस दाहा बारा हजार जाला आहे व गोवेकर फिरंगी याचा जमाव येणार ऐसी मुंबईहून बातमी येते ; व हुजूरून वकील राजश्री संभाजी मंगेस मुंबईस आले आहेत त्यासी इंग्रेज गोड गोष्टी बोलतात. परंतु मायावी टोपीकर आहेत. मुंबईस जमाव करून मायावादाच्या गोष्टी सांगतात. याच समयांत इंग्रेजाचा जमाव जाला आहे व दवणकर फिरंगी रामनगरकरास दारूगोळी पोहचावितो. रामनगरकर व जवारकर वगैरा याच समयांत मुल्क मारितात, जाळीतात. तेव्हां दिसोन येते कीं ह्या सर्वांचा विचार येक, रामनगरकरानी मुल्काची धूळ मांडली आहे. येक हजार राउत इंद्रगडा अर्जुनगडाकडे पाठवावयाची असते, तरी तिकडील मुल्काचा आरोप होता व वसई साष्टी येथेंहि राऊत असावे. अर्जुनगड इंद्रगड ह्या किल्यावर गला चढवित होतों तों रामनगरकरानी मना केला. रयेत तमाम पलाली. मुल्क वोस जाला. रयेतीने काय करावें ? येथें जमाव असता तरी सर्वांचे रक्षण होतें. सत्ताविससें माणूस परभारें स्वान्यांस गेले. किल्याप्रमाणें भरती असावी तेहि नाहीं. तारापुरापासोन अलीकडे वसई प्रांतचे प्रगणे राखिले आहे. डाहाणूपासोन अर्जुनगडपावेत वोस जाला. राजश्री कृष्णाजी अनंत कोहजेखालीं आहेत, त्यास तिकडे पाठवीन म्हटल्यास इकडे जवारकर कोळी येऊन मागती धुंदाई करतील, याजकरितां पाठवितां नये. येसी सविस्तर श्रीमंतास विनंतिपत्र पाठविलें. तेथून आज्ञा आली कीं राउताविसीं जें लिहिणें तें आपणांस ल्याहावें. त्याजवरून हे पत्र देऊन राजश्री गणेश अनंत आपणाकडे पाठविले आहेत, तरी आपणांजवळ राऊन

अमतील ते पुढे पत्र पावतांच पाठवावे आणि पुढें जसेजसे जमा होत जातील तसतसे रवाना करित जावे. राऊत आपण रवाना करीतील त्यांस आज्ञा करावी कीं शंकराजीपंत सांगतील तिकडे जात जाणे. याप्रमाणे ताकीद करून सत्वर रवाना केली पाहिजे बहुत काय लिहिणे कृपालोभ असो दिला पाहिजे हे विनंति.

*¶Shankaraji Keshao reports to Trimbakpant the disturbances created by the Chiefs of Jawhar, Ramnagar and Mandvi in the territories of north Konkan and requests more men being sent for keeping order.*

---

*No. 110]*

छ २२ रावर मार्ग-
सीर तिसा

**श्री**

चिरंजीव राजश्री नाना यांसी बालाजी बाजीराव प्रधान आसीर्वाद उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये कुशल लिहीत जाणे विशेष. मिया अछनच्या मजकुराविसी मुजफरखान यास पत्र लेहून तुम्हाकडे पाठविले आहे. त्यास अछनचे व हबशाचे बल होऊन अलीनवाजखान याचा तह जाला याजमुळे ते पत्र मुजफरखान यास द्यावे असा मजकूर नाही, तरी पत्र त्यास न देणे. रा माहादाजी केशव व कृष्णाजी अनंत मागे फिरोन येणार होते. तेथून निघालेच असतील.

*¶The Peshwa asks Nana Purandare not to hand over the letter to Muzaffar-khan as an agreement has been made with Ali Navajkhan of Surat.*

---

*No. 111]* *[26-12-1758*

नकल.

**श्री**

श्रीमंत राजश्री त्रिंबकपंत नाना
स्वामीचे सेवेसी

सेवक शंकराजी केशव साष्टांग नमस्कार विनंति. पृथील कुशल तागायत छ १४ रबिलाखरपावेतों यथास्थित असे विशेष. पेशजी जासुदावरावर सविस्तर वृत्त लिहिले असे त्यावरून कळलेच असेल. सांप्रत वर्तमान आलें कीं इंग्रजाचें आठ मनवर यावयाचें होतें, त्यापैकीं पाच गोव्यास आले. त्यावरी मनवराचा सरदार आहे त्याणी जाऊन गोरेकर विजुरे याची भेट घेतली. उभयतांचे बोलणे जालें व

फिरंगियाचे अरमारहि तयार जालें असे. पंधरा तरांडी थोर पासष्ट लाहान, य ूण अर्सी व इंग्रजाचे मनवर आठ बरोबर मुंबईस येणार. इंग्रजाचा जमाव तेरा हजार व फिरंगी पांच सात हजार व सिदी त्यास सामील जाला, त्याचा जमाव पांच हजार येकूण पंचवीस हजार जमाव करून साष्टी वसई विजेदुर्गावरी मसलत दिसते. फिरंगियाचे आरमार इस्मालखान येणार. सारांश विघाडाची सुरत दिसते, यास्तव आपण कल्याणास सत्वर यावें, अनमान यासाठीं न करावा, हे विनंति.

*¶Shankraji Keshav fears that the combination of the fleets of the English, the Portuguese and the Sidi is directed against Peshwa's coastal places such as Salsette and Vijaydurga and calls Trimbakpant for consultation at Kalyan without any delay.*

---

*No. 112*] [*1-1-1759*

पौा छ २१ जमादिलोवल

**श्री**

श्रीमंत राजश्री पंत प्रधान
स्वामींचे सेवेसी

विनंती सेवक कर्णाजी सिंदे नामजाद किले माहुली साष्टांग दंडवत विज्ञापना. ताा छ १ जमादिलोवलपावेतो माा जवार येथे स्वामीचे कृपादृष्टीकरून सेवकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष. आज्ञापत्र सादर जाहाले तेथे आज्ञा कीं राजश्री कृष्णाजीपंतास सामील होऊन माहितगिरीनें कोल्याचा नीर काढून अजम मुजफरखानहि जवारीवर उतरतील, परसपरे बातमी कलऊन कोल्याचे पारपत्य करणे म्हणोन आज्ञा. ऐसियासीं कृष्णाजीपंत सनदे आगोधर रामनगरात गेले आहेत. सेवकानें गोल्याचा माल व सूर्यमाल देखील वैतरणीचे काठाने नीर काढून अजम मुजफरखान यांसी अडीचशे लोकानसी छ २७ राखरी सामील जवारीस जाहालों. पुढें सेवकास आज्ञा होईल त्याप्रमाणे वर्तणूक करून; तर आज्ञा करतव्य ते करणार स्वामी समर्थ आहेत. जवार हस्तगत जाहाली नव्हती, त्याचे आगोधर मौजे सावर्डे ताा खोडाले येथे कोल्याची व आपले लोकाची गाठ पडली. तेथे काही झीटपीट जाहाली, व मौजे गारगाव येथे युध्य जाहाले. कोल्याकडील बारा माणूस व दोन राऊत ठार जाहाले. आपले लोकापैकी दोन आसामी ठार जाहाले व सात जण जखमी जाहाले. त्याजवर तिहि चौ रोजी जवार अजम मुजफरखान

---

+ कृष्णाजी अनंत referred to in letters 195-196 of Selection 24.

याही हस्तगत केली. दोन आसामी ठार जाहालें आहेत. त्याचे टेकरावालाचे चालवणार स्वामी समर्थ आहेत; व जखमी जाले त्यास काही थोडेबहुत खर्चास येथे दिल्हे आहे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Karnaji Sindia describes a skirmish between his forces and the Kolis and further states that Muzaffarkhan has captured Jawhar.*

---

*No. 113]* *[Recd. 5-1-1759*

छ-९ जमादिलोवल
निसा

श्री

श्रीमंत राजश्री पंत प्रधान
साहेबाचे सेवेसी

ऽ श्री सुबाराव सिंदे साहिबसुभा दंडवत विनंती येथील कुशल मार्गसीर बहुल दशमीपावेतो आपल्या कृपाकटाक्षेकडून आम्हाकडील वृत येथास्थित असे. प्रति विनंती स्वामी यानी आज्ञा केलेप्रमाणे आषाढ श्रावण मासी ठिकाणी न राहाता राजश्री नारायेणराव यासमवेत हा कालपावेतो चाकरी करीत आहो. परसगड व कितूर मसलत करून प्रस्तुत नंदीकडे सोदेकराचा गाव मतवर आहे यास वेढा घातिला आहे. नित्यानी गोळीची चाकरी चुकली नाही. थोडी माणसे जाया होत जातात. साहेबाची मर्जी अवदा मान्ये केली. यापुढे कृपा होईल म्हणोन बेहडा जसा करून दिला तेच मान्ये करून आल्यास राजश्री लक्षुमण कोनेरी न विचारिता रातोरात मजल दरमजल राजश्री गोपाळरायाकडे गेले. राजश्री रास्ते पटणप्रांती आहेत. तेथून पत्रे आणली तऱ्ही थाक नाही. तसाच सिरहटीचा विचार कोणी येक पेसा दिला नाही. सनदा दिल्हीया हातरोखे यावे म्हणतात. राजश्री नारायेणरायाकडील येवज तोहि प्राप्त नाही. देतो देतो म्हणतात. आम्ही कराराप्रमाणे चाकरी करितो न करितो हे राजश्री यास लिहून समाचार घ्यावा, येविशीची विनंती राजश्री नारायेणराव यानी सेवेसी लिहून कारकुनास पाठविले आहे. विनंती करतील त्यावरून श्रुत होईल. बेहडा करून दिला तो आमचा आम्हापासी ठेऊन घेतला आहे. सालपावेतो चाकरीस तफावत न करिता करीत आहो. राजश्री बलवंतराव व आम्ही पतके समस्त येक जागा राजश्री संनिध आहो. विश्वजनाचा प्रतिपाल होऊन ऊर्जित जाहाली. आमचा मात्र उधारकाल आला नाही. साहेबाविना अन्यत्र देवत आम्हास नाही. मनोवाकक्कायेकडून सेवा करीत आहो. ऊर्जित करून सेवा घेणार स्वामी समर्थ.

आंतरसाक्ष ईश्वराचा आवतार आसता विशप लिहिणे शक्त नव्हे. दोन तीन वरुषे लोकास येक पैसा पावला नाही. आसी हलाखी कंठीत आहो. आपल्या आंघ्रीकमलावलोकन होईल तो दिवस धन्ये वाटेल. सेवेसी श्रुत होये हे विनती.

¶*Subrao Sindia serving under Gopalrao Patwardhan in the Karnatak reports the result of his loyal services and requests encouragement.*

---

*No. 114*] [*6-1-1759*

* * * ( वरील भाग पार फाटून गेला आहे. )

येतेचा जाबता केला असेल तो (फाटलें * * ) स खावंदाकडे पाठवावा लागतो. त्याचे उ(तर) दिल्हे कीं, किल्यांत कांही विशेष बहुतसा नवता. यथाकिंचित असेल त्याची यादी तुम्हास देवितो. मग मर्जी रक्षावी लागली. विदित होय. दुसरे खानास वर्धेऊन श्रीमंताची व आपली कृपा आहे. येथील कामाचे यप तुम्हास· आलें व पुढें मातबर कार्ये येणार तुमच्या जवामर्दीवरी. त्याजवरून बहुत खुश होऊन बोलिले कीं, जंजिरा आदीकरून सर्व हस्तगत करून देईन आणि खावंदासी येकसान राहून कबिले पुण्यास आणून ठेवितो. येसे बाह्यात्कारी भापण करितात, परंतु दृष्टीस येईल तें खरें. जवारच्या तीन तोफा उतम व जेजाला येश्या स्वारीसमागमें तयार केल्या आणि .किल्याचे ठाणे राजश्री त्रिंबक सूर्याजीचे स्वाधीन छ ६ जावली केले. रामनगर राज्याचा प्रधान भेटीस छ ७ माहे मारी आले आहेत. निवेदन होय. वाघेरकर देवजी अवधूतराव व महादजी सरनाईक यासी सदासिवरायानी रामभट मध्यस्त पा आहेत जे, या उभयतांस घेऊन आल्यावरी तुमचे व त्याचे उतम प्रकारे श्रीमंताकरवी गौर करविला जाईल. तेहि लोकरच येणार आहेत. हे वर्तमान राव-मारुलुले याणी स्वामीपासीं विदित केलेच आहे. वाघेरकर आल्यावरी येथून कूच करितील. खानापासीं बंदरकिनारेची व दुरील राजकारणे खेलत आहेत. नासिकापासून घाटाखाली आलियावरी पंचवीस हजार रुो कर्ज सावकारापासून घेऊन सिबंदीस पैसा दिल्हा नाहीं ( फाटलें * ) सर्व वर्तमान निवाजी. ( यापुढील बंद फाटला आहे. अपूर्ण आहे. )

¶*The letter is incomplete the contents of which refer to some affairs regarding the capture of Jawhar and Ramnagar.*

6938

No 115] [5-3-1755

पौ छ २३ जावल

श्री

श्रीमंत राजश्री पंत प्रधान
स्वामीचे सेवेसी

विनती सेवक रामाजी माहादेव मुा ठाणे साष्टी चरणावरी मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. ताा छ १९ जावलपावेतो स्वामीचे कृपावलोकनेकरून वर्तमान यथास्थित असे विशेष. पहिले पत्र इग्रजाचे गेवकास होते व स्वामीस होते ते पाठविले. त्यातील खुलासा निवेदन जाहालाच असेल. त्याजवर आपण येथे येताच रामजी शिवाजी व सिवजी रणसोड इग्रजाकडे मुबईस पाठविले. त्याबरोबर सागोन पाठविले की, आरमाराची मुसुब राहिली नाही. फारतर येक महिना अवकाश आहे हा खराच, परतु कितेक नाजूक प्रकार आहेत. त्याच्या विचारे याच अवसरात जावे, सा महिने जुजत बसावे, ते येक महिनीयाने खामखा काम करावे. तुमचा आमचा करार गुदस्ता जाहाला तो समय हाच होता. हुजुरून तुमचे करारीवर सर्व गोष्टी तयारी केली असता आता मागे घ्यावे हेहि वैसाव, ऐसे सागोन पाठवियावर त्याणी पत्र पाठविले व रामजी सिवजीनी पत्र पाठविले ती बजिनस शेवेसी पाठविली आहेत. त्याची आमची भेट उद्याचे बुधवारी छ २१ मिनहूस नेमिली आहे. भेट जाहालियावर करारमदार होईल. इग्रजाचा खुलासा की तुलाजी आगरे सबल. बहुत दिवसी दौलत जजिर आहेत. त्यावर जावे तेव्हा खामखा साच्यार महिने बसोन खणोन काढावे. श्रीमताची ममलतीची चाल पहिल्यापासून याप्रमाणे आहे. प्रस्तुत गैरहगाम, आरमाराचे दिवस दर्यात फिरावयाचे राहिले नाही. याकरिता मागे घेतो. पाहाता अर्थ खराच, परतु राजश्री खडोजी माणकर व दुसरे ग्रहस्त कितेक आहेत ते या मजकुराचे आहेत. त्याचे मानस याच वेलेस जावयाचा ठराव हुजूर जाहाला याकरिता सामदामप्रकारे इग्रजास सागोन करार होईल तो शेवेसी लेहू. वरकड तयारी आज्ञेप्रमाणे जाहाली आहे. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

¶*Ramaji Mahadeo sends to the Peshwa the despatches received by him from the English and communicates to him their explanation in respect of help to be rendered to the Peshwa to destroy Angria's power "Tulaji Angria is strong and a powerful navy is therefore required to annihilate him" said they*

No. 116] [19-1-1759

पो २९ जमादिलाकर

## श्रीगणपति

सेवेसी विठल सामराज मुा श्रीरंगपटन चेरनावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. सेवकाचे वर्तमान ता। १९ जावल परियंत साहेबांचे कृपावलोकनेंकरून श्वस्त क्षेम असो. वर्तमान. मैसुरास अद्याप मोर्चे लागलेच आहेत. उतरेच्या दरवाज्याकडून मोरचे जवल गेले आहेत. खंदकापासून हातधोंड्याचा तफावतीने जवल गेले अहेत. पूर्वेच्या दरवाजापासून अर्धे गोलीचा टप मोरचेजवल गेले आहेत. पुढें मोरचे चालायास विलाज नाहीं. उतरेकडून सुरंग चालविला होता तो खंदकाजवल गेला, तीं वरून गोळ्यांची मार व धोंड्यांची फार करितात. खंदकांत तळ्याचें पाणी सोडलें. सुरुंगाचा विलाज राहिला. किल्यांतून तोफांचा मार फार होतो. बाहेरल्या सहा तोफा किल्यांतील तोफांच्या गोळ्यांनीं फोडून टाकिल्या. वरून बेजरब मार देतात. सहा तोफा फुटल्या, म्हनून खंडेराये पटनास छ ८ रोजीं आले. पटनच्या किल्यावर फिरून तमाम तोफा पाहून पांच तोफा उतरावयाचा हुकूम केला. तितक्यांत किरतानें बोलाऊन विचारलें जे किल्यावरील तोफा कशास उतरितां, लष्करांत तोफांस काय कमी आहे हे म्हनाले जे लांबटप्याच्या असाव्या, त्यांतून दोन तोफा उतरून व गर्नाळ येक येसी लष्करास पाठविली. लष्करांतही खर्चास नाहीं. येथे यांनीं खर्चाची योजना केली तीं साहुकार तो देईनात. मग कर्तरास मागितलें. त्यांनीं सांगितलें जे सर्व राज्ये मुलूख तुमच्या स्वाधीन केले आहे. आम्हांजवळ काये आहे? त्यावर खंडेरायांनी विनंति केली जे, कांही तरी खर्चास देवावें. फिरून तो येवज सत्वरीच खजाने दाखल करीन. यैसा अर्ज केल्यावर राज्याने आज्ञा केली जे, येक लक्ष रुपयाचें सोनें देवितो. मग दिल्हें न दिल्हें नकळे. छ ११ रोजीं संध्याकाळीं खंडेरायांनीं आम्हाला भेटीस बोलाविलें. भेटी झाल्या. कितीक वर्तमान आज्ञेप्रमानें निरोपिलें. च्यार घटका येकांतीं बसले होते. कर्तराची थैली आम्हांजवळच दिल्ही. म्हणाले जे सकाल तुम्हांस बोलाऊं पाठवून कर्तराची भेट करितों. हें पत्रहि श्रीमंतांचे देऊन हें वर्तमानहि सर्व निवेदन करून पत्राचीं प्रत्योतरें देऊन श्रीमंतांकडे जोडी रवाना करूं. गतवर्षी राजेश्री गोपाळरावजीनीं जो करार केला आहे त्याप्रमाणें भुकणजीची निशा केली आहे. काही थोडें बहुत बाकी आहे त्याचाहि निर्वाह करून देतो. पुढें श्रीमंताची

मर्जी रक्षने आम्हास जरूर आहे. या कराराप्रो हली सालचीहि तजवीज करून तेहि सावजीची निशा करितो. संवंस्थानात तो काही बल राहिला नाही. सर्व आपल्या जिवावर आंगेजनी केली आहे. राज्याच्या घरांतील कलह या प्रकारचा लागला आहे त्याचाहि बंदोबस्त केला आहे. दो चौ रोजा सला मामला करून विल्हे लावितो. जवाहिराच्या येवजाचीहि तजवीज केली पाहिजे. इकडे मोगलाची बाकीहि राहिली आहे. च्यार पाच वर्षे झाली, पुढेहि त्याच्या फौजा येनार. वकील आला आहे तो अद्याप सिन्गतच ठेवला आहे. श्रीमंताची मर्जी रक्षने आम्हास जरूर म्हणून तुम्हास लवकर बोलाऊन घेतले येशा बहुताप्रकारे गोष्टी सांगितल्या. आम्हा दोवास दोन पासोड्या देऊन रवाना केले. सकाळ फिरून बोलावितो. येकंदर दरवाज्याची परवानगी देतो. सुखी येत जात जावे असे बोलले. दुसरे दिवशी बोलावतील म्हनून वाट पाहेली. तिसरे दिवसी चिठी लिहून पाठविली. येक दोनदा तो जाबसालच न केला. येक दोनदा बोलले जे संध्याकाळी सकाल बोलावितो. न बोलावले. आम्ही चिठी लिहून पाठविली जे, आम्हास देवदरशेनास जायाची तरी परवानगी देवावी. आनि आम्ही येथे येऊन पोहोचलो ते वर्तमान श्रीमंतास पाठवावे. येक जोडीची गदीची चिठी देवावी. काही जाबसाल करीनात. पाचसाहा दिवस होते. छ १४ रोजी त्रितीये प्रहरी लस्करास उठून गेले. जाबसाल कांही नाही. याच्या नजरेत आजचे काळी कोन्हीहि नाही. -आपले लस्करचे वर्तमान तो येथे की, मोगलाची श्रीमंताची लढाई लागली आहे. प्रस्तुत लष्कर येत नाही म्हणून बेफिकीरीने आहेत. याजपाशी येथे फौज दोन हजार गणतीची सात पाचसे स्वार चांगले निघता मुशकील. दोन अडीच हजार गाडदी आहेत. बारा तेरा तोफा आहेत, तमाम लष्कर बेजार झाले आहे. कोन्हीहि या उभयेतास बरे पाहात नाही. आबालवृध सर्व आपले फौजेचा मार्ग लक्षितात. रात्री लष्कर सामसूम असे, ते आतून काही गडबड झाली, प्यादे निघाले तर येकाचे घोडे येकाचे हती रात्रीतून उग्याच लस्करात आवाया होल्यात. पटन्यात सर्व दरवाजे मिळून सेंभर दार आहेत. मुलकांत तर जागाजागा बेबंद, कोठे बंदोबस्ती नाही. मुलूक तमाम लुटितात. घाटाखाली मुलुक मात्र हैदरआली नायेकाखाली आहे तो खुशाल आहे. यांची फौज कुडप्याच्या मुलकात गेली आहे त्यास इकडे येऊं न यावे, आपली दोन हजार फौज त्याजमधर्ती असली म्हणजे इकडे येत नाहीत. दोन तीन हजार फौज घाटाखाली दिंडगलास पाठवावी आणि दोन हजार फौज इकडे आली तर फार आहे. अविंधाची जड पडेल. सर्व दिंडगलात आहे. आजचे काली सर्वहि आपले फौजेची वाट पाहतात. सर्वास कोटात मालचगस

आतचं आत नागवितात. कोन्हास मामलती देतात, तर दुसऱ्या कोन्ही काही अधिक दिल्हे तर त्याजपासूनहि पैका घेऊन त्यास देतात. पहिल्याचा पैका बुडाला याप्रो करीतात. सर्व कारभार दोडमा कर्तराची मातुश्री व राव याचा आहे. याचा अविंधाचा व रायाचा मनोदये की मैसूर हस्तगत करून तेथें सर्व जकीरा भरून आपली माळ मालियेत व कबिले बदस्त तेथें ठेवावे, सर्व मानें आपन करावे, असीं तजवीज मैसुरांतील. वर्तमान राज्यापासी हजार बारासे स्वार चांगला आहे व दोन हजार गारदी व हजार दीड हजार प्यादा याप्रमाण जमियेत आहे. खायास आनपाणी लकडी दाल वगैरे सरंजाम पुस्कल आहे. वैरन व विड्याची पाने हे कम आहेत. दक्षनेकडून रस्त पोहचत होती ते आठ दहा रोज बंद झाली. पा * * जकिऱ्याची आहेत. दारूगोळा पुस्कल आहेत. साहा महिन्याची बेगमी आहे म्हनून सांगतात. सल्याचा मजकूर तर किल्यातून जतुचिक्या म्हनून कारभारी राज्याचा तो येत असतो व याजकडून लालखान म्हणून सौदागर आहे तो जात असतो. जात्रसाल ते किल्यातून सांगून पाठवितात जे, बेंगळूर व नादगिरी व घाटाखाली अनंतागिरी याप्रो या तिही किल्यातून हे किल्ला राद्यास द्यावा व दीड लक्ष होनाचा मुलुक जिकडे द्याल तो द्या. हे म्हनतात घाटाखाली अनंतागिरी दिल्ही तर फिरंग्यासी राजकारण करील. बेंगळूर व मदगिरी दिली तर श्रीमंतासी राजकारण करील. होसूर घाटाखाली गढी एक आहे ते राज्याकडे अजून चालत आहे ते गडीत मात्र बसून अशी हजाराचा मुलुक देतो तो घ्यावा. हे म्हनतात ते येकत नाही. असेहि करता सल्यावर गोष्ट ठहरली तर दरम्यान मातबर मानूस हैदरअलीखांचा भाऊ शाहासखा व भुकणजी आपल्याकडील येसे दरम्यान यावे, यानी फौजेसुधा उठून जावे. आम्ही आपला बंदोबस्त करून जमियेतीनशी जाऊन. शहासखा दरम्यान येत नाही. भुकणजी श्रुत्रमर्णास गेले आहेत ते अद्याप आले नाहींत. हे दरमियान न ये यास प्रयोजन हे बेइमान आहेत. याच्या चितात जे राजा व बारकी व्यंकटराव व श्रीनिवासराव या तिघास नाबूद करावे. या गोष्टीस हे चुकनार नाहीत. यास्तव हे मधे येईनात. भुकणजीस कागद खंडेरायाने छ १७ रोजी पाठविले आहेत. पाहावे येतो की काय. किल्यातील म्हणतात जे हे दोघे मधे आले म्हनजे कसेहि करून सला करावा. हा प्रसंग निवाळून पुढे श्रीमंत आल्यावर पाहून घेऊं म्हनतात. आपल्या फौजाची चातकऱ्याये वाट पाहतात. फौजा आल्या असे येकिले म्हणजे येथे येढा उठेल असा रंग दिसतो. हैदरनाईकाची फौज घाटाखाली कडप्याच्या मुलकांत गेली आहे. त्यानी तर पाळर यानबंडी घेऊन कृष्णगिरीगड पहाडी घेतल्या म्हणून येकिल्यात आले. हा किल्यास

फार दिवस लागले. आपल्याकडील फौजा येणार म्हणून त्या फौजेस यानी बोलाऊ पाठविले आहे. ते फौज इकडे न यावी. ये वेळेस फौजा लवकर यावा. आनेकल पालेकिराचे होते ते यानी घेतले. बेंगलुरावर मुराररायाची फौज आली म्हणून आवाई आहे. कागदीपत्री वर्तमान कळले नाही. नरसिपूर नंजराजाकडील अद्यापि भांडत आहे. याचे ५०० बार व हजार प्यादा व दोन तोफा आहेत. त्यानी बाहेर निघून याच्या लोकास तुडिवल म्हनून खबर छ १७ मिनहूस आली. यानी आज येथून २०० गाडदी रवाना केले. पटनच्या किल्यात जकिरा नाही. माहगाईमुळे उर्धा+ जातील. जकिरा तमाम खाली केला. आता छ १२ रोजी खंडेराय जाऊन पाहिले. जकिरा कांहीं नाहीं. मग तमाम गढीवाल्यास पत्रे गेली जे, गला खरेदी करून किल्यात दाखल करा. घाटाखालीहि पत्रे गेली. अशात आठा दाहा रोजाचा वेढा पटला तर खायाचाचून याचा आटा बंद होतो. सर्वत्र आम्हास पुसतात जे तुमच्या फौजा इकडे येतात कीं नाहीं? आठा पंधरा रोजात येणार म्हणून सांगतो. फौजा आधी दिंडगलाकडे व तिरतून वानवाडीकडे रवाना कराव्या, आनि इकडे एक दोन हजार फौज फार आहे. त्रिचनापलीचा किला फुलचेरीवाल्यानी महमदआलीपासून काही द्रव्य घेऊन किला दिल्हा. एथे पत्रे आली म्हनून येकतो. पटनात दारूखाना छ ९ रोजी उडाला. गुरुगोडीची आग पडिली. तीस चालीस मानसे उडाली व पनास मानूस जखमी झाले, याप्रो वर्तमान देखले येकिले. आमचा जासूद जायास कोठे फिरकूं देत नाही. गढीची चिठी देत नाही. आम्हाकडे कोनास येऊं देत नाही. लस्करात दोन तीनदा जासूद पाठविले होते. आता बंदोबस्ती केली आहे. वाटेवाट चौक्या बसविल्या आहेत. त्या चौकीवाल्यानी आमच्या जासुदापासून चिठी घेऊन जावी, यास येथेच बसवावे, यास जाब आणून द्यावे, याप्रकारे झाले आहे. तीन महिने मोरचे लागले आहेत. दीड दोन हजार मानसे बाहेरील मेली. चोरावे सुटले आहेत. एथे धारण तांदूळ चार पाच सेर, रागी सात सेर, दाळ चार सेर, तूप सेरभर, तेल दोन सेर, गहू पाच सेर, उडीद साहा सेर, कुलथी सात सेर, पर च्यार सेर याप्रो धारण. आपले जोडीचा निभाव होईना म्हनून हरतजविजीनी सिन्यास पत्रे पाठविली. सेवेसी श्रुत होय. महागाईमुळे खर्चाची तसदी फार आहे हे विज्ञापिता. ताजा कलम छ मजकुरी प्रहरा रात्री राजश्री भुकणजी यात्रेहून आले. दुसरे दिवशी त्यांची भेट झाली. कितीक वर्तमान आज्ञेप्रो निवेदन केले. त्यानी सांगितले जे येथे शिवाये फौजा पैसा देत नाहीं. राजेश्री गोपाळरावजी गेले तेव्हा ज्या हुंड्या करून दिल्हा त्या-

+ उधा=उगा, निमूटपणें.

6943

दिसोन आले. तरी हाली हे पत्र आपणे लिहिलें आहे. तरी जे गोष्टींनें खजाना येथे पोंहचे आथवा महंताचे पदरी पडे ते केल्यास उतम आहे. हे गोष्ट तुमचेकडून होऊण न ये तरी परभारे पारपत्य करोण खजाना आणावा लागेल ऐसे पष्ट समजोन खजाना सोडूण देवणे. पुढे त्या मार्गे आनीक खजाना महंताचा येईल त्यासी मार्गी उपद्रव न होये ते करावे.

१ राजश्री त्रिंबाजी भोसले यांसी पत्र की सरकारचा ऐवज राजश्री जानोजी भोसले सेनासाहेब सुभा याणी महंत हवसपुरी गोसावी याजकडून देविला आनि गोसावी यांसी ऐवज कटक वगैरा येथे लाऊण दिल्हा, त्यापैकी कटकाहूण खजाना येत होता, तो तुम्ही रायेपूर प्रांत छेतिसगड येथे आटकाऊण ठेविला, हे गोष्ट उतम न केली. तुम्ही मातवर वंसज आसोण कनिष्ट कर्मे करावी, येन्हेकरूण ल्वकिकास हाण होऊन वेर्थ श्रम पावावे यात उतम नाही. सरकारच्या भर्णेयाचा आयेवज येत आसता तुम्ही आटकाऊन ठेविला, येणेकडूण परिनाम उतम होणार नाही, हे पुर्ते समजोन खजाना बदरका देऊन नागपुरास आथवा पुन्यास पोहचाऊन देणे. आनीक ते मार्गी खजाना येईल त्यासी मुजाहिम तुम्ही न होणे व होऊ न देणे. या कामास मुजरत कारकून व जासूद पाठविले आहे. यासी मसाला.

---

३

येकून तीन पत्रे यावी.

छ १८ जाखर तिसा माघ वद्य

लिहिणे

¶*Drafts of letters addressed by the Peshwa to Janoji, Mudhoji and Bimbaji Bhonsles regarding the collection of dues from Bengal and Katak by Haunsapuri Gosai. The provinces were given over to the Gosavi in settlement of the debts received from him The paper shows how careful the Peshwa's Government was in preserving the credit of bankers.*

---

*No. 118]* *[12-2-1759*

पौ छ २ जमादिलावर
तिसा माघ

श्री

श्रीमंत राजश्री भाऊ-
साहेब स्वामीचे सेवेसी

विनंती शेवक रामाजी माहादेव चरणावरी मस्तक ठेऊन सिर साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता छ १३ माहे जमादिलाखरपावेतो स्वामीचे कृपावलोकनेकरून

येथील वर्तमान येथास्थित असे विशेष. स्वामींचे आज्ञापत्र छ ६ मिनहूचे सादर. तेथे आज्ञा कीं, केसो माहादेव काणे हबशाकडील चिठ्या आणून मुलकांत टाकून दंगा करीत होते. ते व सिवराम जंगम ऐसे दोघे सुवर्णदुर्गाहून हुजूर रवाना केल्याप्रा पोहचोन सर्व हकीकत मनास आणितां केसो माहादेव याचे आंगी मुदा लागला. त्यास हे म्हणतात कीं, सेख दरवेस व सेख हसन याचे कबिले सुवर्ण-दुर्गात अटकेत ठेविले आहेत, त्यांसी राजकारण करावयासी तुम्ही सांगितलें त्यास आपली सचोटी पडावी याजमुळें इतका विचार केला. त्यास हा प्रकार तुमचे अनुमते जाहाला कीं कायें? तुम्ही यांस राजकारण करावयास सांगितलें होतें, ते तपसीलवार हुजूर लेहून पाठवणें. या प्रकर्णात राजेखान गोरेगांवी होता, त्याचें घर दस्त करून त्यास तुम्ही अटकेत ठेविले आहे त्यास हुजूर पाठवणे. त्याचे घरांत कागदपत्र चिठ्या वगैरे उपयोगी सांपडले असतील ते व सिके कटार त्याची, त्यास बळकटी करून हुजूर पाठवणे. याखेरीज आणखी या कामात असतील ते रवाना करणे म्हणौन आज्ञा. यैसियास केसो माहादेव यांणी गुदस्तां सेवक जंजिरे सुवर्णदुर्गी असतां सांगितले कीं आपला संदर्भ सिदी याकूदकडेस आहे. त्याचे बोलींचा मजकूर कांहीं सांगितला. त्याजवर सिदी सुरूल व हसन नाईक व कुकजी वेल(?) याखेरीज रा। बाळाजी कृष्ण व गोविंदपंत सटकर यांची राजकारणें दाट लागली. इतक्याचे बोलीची येक-वाक्यता बाळाजी कृष्ण याणी प्रमाणांत आणून लिहिले ती पत्रे हुजूर सेवेसी पाठविलीं, ते समई केसो माहादेव साहीस सेवकाजवळ होता. म्हणो लागला कीं राजकारणे आपणाजवळ सांगतात हीं प्रमाण नाहीं. मजला आज्ञा कराल तरी मी जंजिरेयांत जाऊन सिदी याकूद यासी भेटोन आपले निसबतीचे सूत्र ठीक करून येतो. येविसी आणभाश करून जावयासी सिध्ध जाहाले. ते समई त्यास सागितले कीं, जंजिरेयावर जातां हा लौकीक होऊन शामल खबरदार जाहाला आहे. तुम्ही ठीक करून येणार, समयावछेदें तुमचा नाश केला तरी ब्राम्हणाचे दुर्निमित्य येईल. हे गोष्ट कांहीं कार्याची नाहीं. याचे उत्तर मार-निल्हे याणी केले की, माझे दुर्निमित्य कोण्हावर नाहीं. मी जातों. निमित्यास जजीरकरांस वस्त्रे व पत्रे द्यावीं. त्यावरून सिदी इभरम खानजाद्या व सिदी याकूद यांसी वस्त्रे देऊन रवाना केले. बराबर बाबोजी सिंदा व देवजी कदम वगैरे खासबारदार च्यार दिल्हे. त्यास माारनिल्हे जंजिरे यांत जातां बाबोजी सिंदा व देवजी कदम बरोबर नेले. दोन खासबारदार राजपुरीस बाहेर ठेविले. आत जाऊन वस्त्रें व पत्रें उभयेता पामळास दिल्हीं. उपरांत सिदी याकूदजवळ केसोपंतानी खलबत केले. उभयेता खासबारदार यांसी त्यातील अर्थ न कळता

सांगितले कीं, मीं ठीक केले आहे. त्यावर जंजिरांतून निरोप घेऊन तल्यास आले. तेथें सेवकापासून दोनसें पुतल्या तूर्त सिदी याकुद यांसी द्यावयाकरितां म्हणून घेतल्या होत्या त्या वाघोजी सिंदाजवल होत्या. त्या रोजेखान गोरेगांवी शामळाकडून हवालदार होता. हा सिदीकडील म्हणून खासबारदार यांसी समजाऊन दोनिसे पुतल्या घेतल्या आणि खासबारदार याचा आम्हांस जजीरकरांची पत्रेंजाव व आपलें पत्र पाठविलें त्यात लिा कीं, तूर्त काम होत नाहीं. मी घरीहून लौकरच येतों. उपरांत राजपुरीस सेवक आल्यावरी केसो माहादेव आला. त्याणें सांगितले कीं, राजेखान शामलाकडील हवालदार गोरेगांवी आहे. तो राजश्री त्र्यंबक विनायेक यांणी अटक करून ठेविला आहे. तो माझे निसबतीचे कामांत आहे. त्यास आणऊन माझे हवाला करावा. त्यावरून त्र्यंबकपंत येथेच होते त्यांस सांगोन याचे हवाला केला. सेख दरवेस व सेख हसन हे हसन नाईक याचे राजकारणाचे आहेत. यांचे कबिले सुवर्णदुर्ग प्रांतें आहेत ते माझे हवालीं करावें. कबिले माझे स्वाधीन जाहाल्याने ते ममतेनें येतील. उभयेता जंजिरेयांत आहेत. याप्रा करार करून राजपुरीहून आपले घरास गेले. पुढे राजेखान मुबईकडून जंजिरेयांत गेला. तेथून मुसलमान सिपाई व चिठ्या सिक्यानिसी आणून मुलकांत पैका वसूल करावयाचा आरंभिला. त्यावर प्रजन्य कालीं केसो माहादेव राजेखानास घेऊन राजपुरीस आले. पंध्रा दिवसांची मुदत जंजिरेयांत राजेखानास पाठवितों ऐसा निश्चये करून तल्यास गेले. त्यास दोन मास होत आले. राजेखानांस घेऊन यावें तें नाहीं. त्यास माणसें पाठऊन केसो पंतास आणविलें त्यावरून आले. वर्तमान पुसिलें कीं, राजेखान नेलान तो कोठे आहे? त्याणी उतर केले कीं, लौकरीच येईल. त्याजवरी केसोपंतास रा बाजी गंगाधर यांचे स्वाधिन करून सेवकाचे शरीरीं स्वस्थता नाहीं म्हणून रेवदंडयास जाऊन पुढे उंदेरीच्या मोर्चेबंदीकारितां थळास गेलों. मागें बाजीपंताजवल राजकारणाची घालमेल सांगोन तल्यास म्हणून गेले ते मुलकात जाऊन पैका वसूल करावयाचे विचारांत लागले. हे गोष्टीचे शोधास रसाळगडाहून रा जिवाजी अवेरे व खेडाहून गोविंद माहादेव चौकसी करितां शामलाकडील सिपाई यांचे घरी राहून हे ते येक होऊन सिवराम जंगम चिठ्या मुलकांत टाकी याची चौकसी होतच आहे. तो राजेखान जंजिरेयाहून बाणकोटास येऊन कबिला लांबवणार, केसोपंत व राजेखान येक होऊन मनसबा करीत होतें, हे वर्तमान हसन नाईकास कलले. त्यांणी बाजी गंगाधर यांसी सांगितलें त्यावरून स्वारी पाठऊन राजेखान यास धरून राजपुरीस आणिला. तो बाजीपंताजवल म्हणो लागला कीं, आम्हांस कामगारीस पाठविले होते, तेथून आलों आतां आपला कबिला मौजे तळे ता खेट येथे केसो माहादेव याचे घर आहे तेथे

घेऊन जातों म्हणून निरोप मागत होतां. त्यास हसन नाईक यास याचे लबाडी-चा मुदा पुरता ठावका होता याकरितां हसन नाईक रेवदंड्यास घेऊन आला. मनास आणितां राजपुरीस येक प्रकार मालुमात केली. आम्हाजवळ येक प्रकार सांगतो पहिलें आम्हाजवळ पध्रा दिवसां येतों म्हणून मुदत केली होती. त्यास च्यार महिने जाहाले. आपला कबिला बाणकोटी नेऊन लबाडी करावी हा मनसबा चितात आला म्हणून रेवदंड्यात अटकेत ठेविला. पुढे थळास गेल्यावरी रसालगडाहून पत्रे आली की, शामलाचे सिपाई मुलकात सिरोन चिठ्या टाकितात. हा सर्व मजकूर केसोपंत काणे याचे निसबतीनी होऊन सिवराम जंगम माारानिल्हे-कडील चाकरमाना सिपाई याणे काा खेड येथे चिठ्या टाकिल्या, हा मुदा शाबूत जाहाला. याप्राो सिपाई धरावयासी गोविंद माहादेव काादार खेड याणीं पाठविले तो शामलाकडील सिपाई पलोन गेले. हा लौकिक जाल्यावरी केसोपंतानी सेवकास थळचे मुकामी पत्र पाठविलें कीं, आपले निसबतीचे राजकारणाचा लौकिक जाला म्हणोन परिहारयुक्त लिहिले. त्यास केसोपंत पुरा लबाड ऐसे चितांत आले त्यावरून किले रसालगडी बेडी घालून ठेविला. जंगमास जंजिरे सुवर्णदुर्गी बेडी घालून ठेविला आणि यांचे वर्तमान कचे हुजूर ल्याहावें तों स्वामीचे आज्ञापत्र सादर होऊन उभयतांस हुजूर नेलें. हाली आज्ञेप्राा सविस्तर वर्तमान सेवेसी लिहिले आहे. राजेखान यासी रे(व)दंडेयाहून मजबुदीने हुजूर रवाना करणें म्हणोन राा माहादाजी रघुनाथ यासी लेहून पाठविले आहे. राजे-खानाचे घर आम्हांकडून जफ्त जाहाले नाहीं. त्याचा कबिला राा जयराम त्र्यंबक याणी गलागडी आणून ठेविला आहे. कागदपत्र सिकेकटार काय सांपडले असेल ते त्याकडेस असेल. सेख दरवेस व सेख हसन याचे कबिले केसो माहादेव याचे स्वाधीन केले होते. ते फिरोन रसालगडी नेऊन ठेविले आहेत. या प्रकर्णात दुसरा कोण्ही आढळांत आला नाही. राजेखान हुजूर रवाना केला आहे. शेवेसी कलावें. राजेखान यांसी राजपुरीस आणऊन याजपूस करावी, त्यास शरिरास अनारोग्यता यामुळें घडोन आले नाहीं. हाली सेवेसी पाठविला आहे. याची याजपूस चागली जाहालीयासी केसो माहादेव याचे राजकारणात असतील ते सविस्तर निवेदन करील. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶*Ramaji Mahadeo explains the duplicity of Keso Mahadeo who promised the writer his assistance to capture Janjira and did acts violating his promises.*

श्री

आसीर्वाद उपरी. राजश्री कृष्णाजी अनंत[1] याणी पत्र पाठविले त्यात खुलासा आम्ही रामनगरास येऊन शह दिल्हा. त्यास जवारीहून मुजफरखान याणी पत्र पाठविले की, रामनगरकरास आम्ही अश्वासन दिल्हे आहे, त्यास उपद्रव न देणे यैसी पत्रे येत गेली. त्याचा मजकूर दिवसगतीवरी घालावयाचा दिसोन आला त्याजवरून रा सटवोजी जाधव व येशवंतराऊ पवार यास पत्रे पाठविली. ते आले. ते आम्ही येक होऊन रामनगरचे पारपत्य केले. त्याजवरी हे वर्तमान खानास कलताच जवारीहून आले. सर्व येक जाले. खान रामनगरकरास आम्ही आश्वासन दिल्हे आहे त्याप्रो तुम्ही सर्वांनी यावे, धन्याजवल नेऊन याचा गौरे करावा, याप्रो बोलले. त्यास राजाहि येऊन भेटला. त्यावरी सटवोजी जाधव व खानानी बसोन विचार केला, रामनगरकराचे राज्य रक्षावे. आपणासहि बोलाऊन सला पुसिली. आम्ही ते विज्यापूरचे पातशाहाचे चाकर, विज्यापुराखालील त्याणी खाऊन आसावे, जबरदस्तीने ठिकाणे घेतली आहेत ती सोडावी ऐसे सागितले. या(स)प्रो जाले म्हणजे कोल्याची जड मोडेल म्हणून लिहिले व तुम्हास त्याणी सविस्तर मजकूर लिहिलाच आहे. त्यास याउपरी कोल्या(ची) जड मोडे, मुलकात उपद्रव न होये ते करणे. कोली लबाड जबरदस्ती आहे तो उगेच राहातील मागती लबाडी करावयास चुकणार नाहीत, याचा पुर्ता विचार करून करणे ते करावे. रामनगरकर व जवारकर व पेठकर वगैरे यास घेऊन खान तुम्हाकडे जाणार होते ते गेलेच असतील. सविस्तर पेशजी लिहिलेच आहे. कृष्णाजीपतानी लिहिले हे चागले. ठाणे आसले तरी त्यापासून पा(पैका) घ्यावा त्यात घ्यावे. वरकड पुर्ते पारपत्य व्हावे आगर जामीन घेऊन हुजूर सेवा करावी. कार्याकारण आपलाहि बदोबस्त त्याची स्थापना केली तरी त्यात आसावा. आपलेकडील त्रिंबकजी आगर आपाजी रजावंदीस वाटेवर नीट चाले आसा पाहून जो ठेवणे तो ठेवावा. त्यात जे उतम बदोबस्त दिसेल तो करणे रा छ १९ जमादिलाखर. हे आसीर्वाद.[2]

*¶Sadashivrao Bhau writes to Nana Purandare regarding assurance of safety given to the Raja of Ramnagar by Muzaffarkhan. In this connection letters Nos. 109-112 in this Selection and No. 211 of Selection 24 may be referred to.*

---

१ उपनाम तांबे. २ येथून हस्ताक्षर भाऊसाहेबाचे. पत्र बहुधा नाना पुरंदरे यास असावे.

No. 120] [24-2-1759

पो छ २९ जाखर

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य
राजश्री कृष्णाजीपंत दाजी
स्वामींचे शेवेसी

पो नारो त्रिंबक कृतानेक सास्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल जाणून स्वकीये लिहीत असावे. यानंतर आपण पत्र पाठविले त्यात लिहिले की घणदीवचे मुकामीहून व मार्गीहून पत्रे दोन चार पाठविली ती व बसईहून व सरकारची पत्रे पाठविली ती पावलीच असतील. त्याचे उतर व तुम्हाकडील वर्तमान व शामलाकडील वर्तमान व इंग्रेजाचे तुमचे कैसे आहे ते सविस्तर बारीक मोठा मजकूर लिहून पाठवावा. आम्ही नवसरीस मुकामी आलो म्हणून लिहून पाठविले. त्यास आपली दोन पत्रे आज शनवारी दोन प्रहरा पावली व बसईचीहि आताच पावली व श्रीमंत राजश्री नाना स्वामींची पत्रे पाठविली त्याची उतरे पाठविलीच आहेत आपणास पावतील. शामलाने विसावे जमादिलाखरी इंग्रेज सुरतेवर चाल्हून गेला होता त्यास दोहीकडून तोफखाना सुरू जाला. त्यास शहरातून मार किल्यावरचा जाला, त्याने इंग्रेजाचा येक भला माणूस व च्यार इंग्रेज गैरसिपा(ई) गोल्याने उडून गेले. त्याजवरून इंग्रेजाचा मोहला मुरडून मुकामास आला. सिदीमध्ये भांडायाचा जोम बराच आहे परंतु शहर हाती नाही, याजकारणे कसे होईल ते पाहावे. इंग्रेजाचे आमचे फारच सख्य चालते. तो रोज आम्हाकडे माणसे पाठऊन वर्तमान लिहून पाठवितो. आम्हाकडूनहि बातमीस माणसे जातात. हाली आपली स्वारी आलियावर राजश्री दामोदरपंत इंग्रेजाकडे पाठविले आहेत ते आलियावर आपणाकडे पाठऊ. आपण याउपरी फार पुढे न जावे. येथील जाबसालासारिखे लिहून पाठऊ. वरकड आलेनचाहि सीदीस भरवसा नाही. क्षणक्षणा त्यास बोलाऊन खरे करितो येसा विचार आहे. बारीक विचार लिहिणे ते राजश्री दामोदरपंताबराबर सागून पाठऊ. कळावे बहुत काये लिहिणे कृपा लोभ असो दीजे हे विनंती. रा छ २९ जाखर हे विनंती.

¶*Naro Trimbak gives to Krishnajipant an account of the fighting between the English and the Sidi at Surat.*

No. 121] [2-3-1

छ ९ रजब फाल्गुण तिसा

(श्री)

आसीर्वाद उपरी रा। दमाजी गायकवाड याजकडील रुपयांची निशा होत याउपरी येके दोहो रोजांत उपाशी बसऊन निकाल करून घ्यावा लागेल लिहिले ते कलले. ऐशास त्याशी च्यार गोष्टी उत्तम सांगोन पैका घ्यावा त्यानींहि द्यावा, यातच उतम आहे. असेंहि करिता पैका न देत तर सांगावे की चिरंजीव राजश्री नाना पुरंधरे तिकडे आहेत त्यास पत्र तुमच्या मुलकाची जफ्ती करितो. याप्रमाणे सांगोन पाहून पैका आला उत्तमच, नाही तर चिरंजिवास पत्र पाठऊन जफ्ती करावी. रा। छ २१ सुहूर सन तिसा खमसैन मया व अलफ. निशा+ नच होय तेव्हा माहाल जफ्त पाहिजेत हे आसीर्वाद.

¶*Peshwa Nanasaheb writes that a threat should be administered to Damaji Gaikwad that if he failed to pay off the arrears due from him, the jagir in his charge would have to be confiscated.*

---

No. 122] [20-3-1759 (?)

श्री

श्रीमंत राजश्री भाऊ

स्वामीचे सेवेसी

सेवक महिपाजी राम कृतानेक नमस्कार विनंती. येथील क्षेम ता। छ २० माहे रजेब जाणौन सेवकांचे वर्तमान येथास्थित असे विशेष. स्वामींनी दया करून जासूदजोडे समागमे आज्ञापत्र पाठविले ते छ १० रजेबी पावोन संतोश जाहाला. पत्री आज्ञा जे नबाबाच्या शरिरास आरोग्य जाहालीयाचे वर्तमान लिहून पाठवणे. त्या प्रांतीचे नवल विशप वर्तमान लिहून पाठवीत जाणे. वरकड सविस्तर उतरे तीर्थरूपानी लिहिले आहे त्याजवरून कलेल म्हाणौन स्वामींनी लिहिले. अशास नबाबास आरोग्य जाहाले. लेकाची शादी छ २७ रजेबी करितात. इकडील सविस्तर वर्तमान श्रीमंत राजश्री पंतप्रधान याचे पत्री लिहिले आहे त्यावरून सेवेसी स्मुत होईल. राजश्री बाबूराऊ सवदेहून हानगलास आले ते मागोन येतात. त्यासमागमे सविस्तर वृत लिहितो. त्याजवरून सेवेसी विदित होईल. बहुत काये लि(णे). सेवेसी शृत होये. हे विनंती.

¶*Mahipaji Ram to Bhausaheb communicating the recovery of the Nawab (Salabatjang) from his illness.*

---

+पत्र नानासाहेबांचें, सबंध पत्र नाना फडणविसाचे हातचें असून सुणेपुढील मजकूर पेशव्याच्या हातचा.

No. 121] [2-3-1759

छ ९ रजब फाल्गुण तिसा

(श्री)

आसीर्वाद उपरी रा दमाजी गायकवाड याजकडील रुपयांची निशा होत नाही. याउपरी येके दोहो राजांत उपाशी बसऊन निकाल करून घ्यावा लागेल म्हणून लिहिले ते कळले. ऐशास त्याशी च्यार गोष्टी उत्तम सांगोन पैका घ्यावा व त्यानीहि द्यावा, यातच उतम आहे. असेंहि करिता पैका न देत तर त्यास सांगावे की चिरंजीव राजश्री नाना पुरंधरे तिकडे आहेत त्यास पत्र पाठऊन तुमच्या मुलकाची जफ्ती करितो. याप्रमाणे सांगोन पाहून पैका आला तर उत्तमच, नाही तर चिरंजिवास पत्र पाठऊन जफ्ती करवावी. रा छ २ रजब मुहूर सन तिसा खमसैन मया व अलफ. निशा+ नच होय तेव्हा माहाल जफ्त केलेच पाहिजेत हे आसीर्वाद.

¶*Peshwa Nanasaheb writes that a threat should be administered to Damaji Gaikwad that if he failed to pay off the arrears due from him, the jagir in his charge would have to be confiscated.*

---

No. 122] [20-3-1759 (?)

श्री

श्रीमंत राजश्री भाऊ
स्वामीचे सेवेसीं

सेवक महिपाजी राम कृतानेक नमस्कार विनंती. येथील क्षेम ताा छ २० माहे रजेब जाणोन सेवकाचे वर्तमान येथास्तित असे विशेष. स्वामीनी दया करून जासूदजोडे समागमे आज्ञापत्र पाठविले ते छ १० रजेबी पावोन संतोश जाहाला. पत्री आज्ञा जे नवाबाच्या शरिरास आरोग्य जाहालीयाचे वर्तमान लिहून पाठवणे. त्या प्रांतीचे नवल विशाप वर्तमान लिहून पाठवीत जाणे. वरकड सविस्तर उतरे तीर्थरूपानी लिहिले आहे त्याजवरून कलेल म्हाणौन स्वामींनी लिहिले. अशास नवाबास आरोग्य जाहाले. लेकाची शादी छ २७ रजेबी करितात. इकडील सविस्तर वर्तमान श्रीमंत राजश्री पंतप्रधान याचे पत्री लिहिले आहे त्यावरून सेवेसी स्रुत होईल. राजश्री बाबूराऊ सवदेहून हानगलास आले ते मागोन येतात. त्यासमागमे सविस्तर वृत लिहितो. त्याजवरून सेवेसी विदित होईल. बहुत काये लि(णे). सेवेसी शृत होये. हे विनंती.

¶*Mahipaji Ram to Bhausaheb communicating the recovery of the Nawab (Salabatjang) from his illness.*

---

+पत्र नानासाहेबांचें, सर्व पत्र नाना फडणविसाचे हातचें असून पुणेपुढील मजकूर पेशव्याच्या हातचा.

No. 123] [16-1-1753

श्री

श्रीमंत राजश्री भाऊसाहेब
साहेबांचे सेवेसी

आज्ञाधारक दमाजी गाईकवाड समसेरबहादुर कृतानेक दंडवत विज्ञापना. येथील क्षेम ता। छ १० माहे रबिलवल मु॥ मौजे मलगांव प्रा। निवायेत आपल्या कृपावलोकनेकरून येथास्थित जाणून स्वकीये आनंदलेखनार्थ आज्ञा केली पाहिजे. तेणेंकरून संतोषाभिवृधि होईल. यानंतर सेवकाचें वर्तमान तर भ्रमामुळें चरणाचे दर्शन घेऊन आज्ञा मागोन स्वार होऊन यावें तें न जाले. तदनंतर श्री प्रेमपुरास आलो. तेथें श्रीचे दर्शन जालियावर शरीरीं आरोग्यता जाली. तेथून कूच करून मजल दरमजल श्रीमंत राजश्री दादासाहेबांचे सेवेसी कसबे खंदार येथें दाखल जालों. तेथून श्रीमंतासमागमे कूच दरकूच आवरंगाबादेस आलों. पाच मुकाम कामाकाजामुळे जाले. कसबे नासिकपावेतो बंदोबस्त जालियाचे वर्तमान आलिया कासारबारी उतरून मौजे मलगाव प्रा। निवायेती येथे आलों. तेथील किलेदार देहावर न ये. मग हला करून पेठ लुट्टन फना केली. किल्यास मोरचे लाविले. येबनाकडील किलेदार खोज्या दोन दिवस भांडला. जागा बहुत बिकट. परतु आपले प्रतापतेजउत्कर्प; तेणेंकरून कार्यसिधि जाली. किलेदार बाहेर काढून श्रीमंती आपले ठाणे बसविले. इतकीयावरं गुजराथ प्रांते जाऊन अमदाबादचे कार्य करणें तें आपल्या प्रतापें होऊन येईल. श्रीमंत राजश्री दादासाहेब सेवकावर कृपावृधि विशेष करितात. सेवकाचे शरीरीं निक्षूण आरोग्यता आहे. येविसी चिंता न करावी. आपला निश्चय हाच की ज्याचें म्हणवावें त्याचेंच म्हणवावें. दोन पिढ्या राजश्री राव दाभाडे सेनापति यांची सेवा केली, परंतु त्यानीं आमचे प्राण जात येथवर आले, तर्‍ही सद्येतां न धरिली. आद्यापिपरियेंत आमचे ठाई त्यांची ममता जे आहे ते साहेबास निवेदनच आहे. अस्तु. आमची येकनिष्ठा त्यांचे चरणीं सुधा होती. तर साहेबांची पूर्ण कृपा होऊन साहेबी सेवकाचा आभिमान धरून ऊर्जित केले. आथपर आपल्यास साहेबाच्या चरणाव्यतिरिक्त कोण्हाचाहि आश्रय नाहीं. कायावाचामनसा साहेबांच्या चरणासी लये लाऊन आसों. आपले ऊर्जित दिवसेदिवस आधिकोतर करणार साहेब समर्थ असत. बरकड आम्हाविसीं आपल्यास कोण्ही कितेक प्रकारें सांगत असतील तर सुखनैव, परतु सेवकाचा निश्चय साहेबांचे चरणीं जो आहे तो किमपि ढलणे नाहीं. आपण साहेब चाकरीविरिक्त दुसरा आर्थ जाणत नाहीं. आमचा आभिमान सर्वप्रकारें साहेबास आहे. साहेब ईश्वररूप

6953

समर्थ आसत. विशेष काय ल्याहावें ! कृपा निरंतर वृधि करून आज्ञापत्रीं सांभाल करावयास साहेब समर्थ आसत. हे विज्ञापना सेवेसी श्रुत होय.

*¶Damaji Gaikwad, writing to Bhausaheb, gives ample assurances of his unswerving loyalty to the Peshwa. The writer, in the course of this letter, also gives the news of his successful assault of the fort of Malgaon.*

---

*No. 124]* *[30-3-1759*

पौ छ १८ रमजान

श्री

तीर्थरूप राजश्री भाऊ

वडिलांचे सेवेसी

आपत्यें सगुणेनें नमस्कार विनंती. येथील कुशल ता। चैत्र सुध त्रितीया मंदवार मु॥ झांसीनजिक प्रयाग गगापार सुखरूप पावलों विशेष. कुरा जाहानाबादेहून पत्र लिहिले त्याजवरून श्रवण जालेच असेल. उपरांत तेथून कूच करून फाल्गुन वद्य चतुर्दशीस प्रयागास आलो. वेणीसंगमी त्रिरात्र राहून तीर्थविध उरकिला. उपरात काली चैत्र सुध द्वितीयेस मुक्रबारी पार उतरोन येथें मुकाम केला: उदईक कूच करून पुढें श्रीस जात असों. या प्रांतीचे वगैरे वर्तमान तीर्थरूपांचे पत्रीं लिहिलें आहे त्यावरून विदित होईल. बहुत काये लिहिणे हे विनंती.

*¶Sagunabai, wife of Janardanpant, informs Bhausaheb of her arrival at Prayag and of her intention to proceed to Benares.*

---

*No. 125]* *[8-5-1759*

श्री

तीर्थरूप राजश्री भाऊ

वडिलांचें सेवेसी

आपत्यें सगुणेनें नमस्कार विनंति उपर येथील क्षेम ता। वैशाख सुध १२ मुकाम श्रीगया सुखरूप असो विशेष. प्रयागचे मुकामीहून पत्र पाठविली ती ती पावलीच आसतील, त्यावरून सविस्तर कलंलच आसेल. श्रीकाशीक्षेत्रास चैत्र सुध नवमीस आलों. तेथे आठ रोज राहून तीर्थविध उरकून तेथून कूच करून मजल दरमजल गयेस वैशाख सुध प्रतिपदेस आलों. येथील गयावर्जनें यात्रेच्या

लोकांची व आपली चालीस लागली आहेत येथील गुंता लौकरीच उरकून श्रीस माघारे जाऊ. उपरांत साकल्यवृत्त वडिलास लेहून पाठऊन बहुत कार्य लिहिणें हे विनंति.

¶*Sagunabai writes to Bhausaheb giving the programme of her pilgrimage to the holy places in the North.*

---

*No. 126*] [*22-11-1759*

छ २६ जमादिलोवल सितैन

**श्री**

श्रीमंत राजश्री भाऊ
स्वामीचे सेवेसी

विनंती सेवक गोविंद बलाल कृतानेक सा। नमस्कार विनंती विज्ञापना. ता। मार्गसीर शुध ३ पावेतो स्वामीचे कृपावलोकनें करून सेवकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष. येथील नजिबखानाचे विगाड जालियाचे वगैरे सर्व वर्तमान दोन च्यार पत्रीं सेवेसी लिहिले त्याजवरून विदित जाहलेच असेल. आलीकडील वर्तमान तर आम्ही आपली सडी फौज व राजश्री जनकोजीबाबाकडील पथकें व रा। अंताजी माणकेस्वर याचे पथक मिलोन सडे दाहा हजार राऊत हरिद्वारासनिध गंगा उतरोन पार जाहलों. तमाम पलीकडील * * * रोहिल्यांची लुटीत मारीत जला * * * * * * * तो जाबतेखान नजिबखा-नाचा * * * * * * सादुलाखान व हापस रहीम ऐसे रोहिले * * * * आम्हास आडवे आले, त्यांसी जूंज जाहले. कितेक रोहिले जुंजांत मारले गेले. पांच सात गाड्या दारू बाण रेहकले मिलोन आम्हाकडे आल्या. रोहिले जलालाबादेचा आश्रय करून राहिले त्यांस घेरून आमच्या फौजा त्यांचा दाणावास बंद करून राहिल्या. येक दोन रोजांत निघोन जाते किंवा लुटले जाते. तो रा। साबाजी सिंदे लाहोराकडे आबदालीचे शहावर होते ते आबदाली आला म्हणून आपली फौज सुधां आले ते अकसमात्र लस्करींच दाखल जाहले; आणि नबाब सुजातदौलेहि आपली फौज तोफखानासुधां घेऊन नजीबखानास सामील जाहले. आम्हास त्यास थोडेच अंतर राहिलें. आलीकडे फौजेंत आबदालीची गडबट जाहली. यामुळे राजश्री जनकोजीबाबानी चिठी लिहिली की तुम्हीं लौकर निघोन * * * * * * * त्याजवरून आम्ही नजिबखानाचा गु * * * * * हिला लुटून जाळून गंगा उतरोन * * * * (आ)बदाली लाहोराकडे आहे जर तो आलि * * * * फौजा

नुकसानी जाली असेल तो यैवज हर-येक स्थलीहून पोहचेसा ठेवावा.

*N* नवाबांची रजावंदी राखोन कार्य करावे.

*T* भागानगर प्रांतीचा मुलुक व अरकाटचा नवाबाचे हुकुमाखेरीज गैर-अमीली जाला तो आमचे व तुमचे इतिफाकने मुटेल त्यापैकी निमे तुम्हीं घ्यावा, निमे आम्हास घावा.

*N* आम्हास काम पडलियास जरव लाविले तर येऊन सर्व प्रकारें काम करावे.

*N* जागीर चिरंजीव भाऊस रायांस दा लाखाची उत्तम द्यावी.

नवाबाजवळ तुम्हीं पोहचल्यावर पुढें कोणी येक मनसबा विचार करणे तो आमचे विचारें शाहानवाजखानाचे रितीने करावे.

*N* आमचे वकिलापासून जैसे शहा-नवाजखान काम घेत होते तैसे घ्यावे.

*T* अम्हाकडील सरदार जाचक वगैरे वगररजा जातील त्यांस तुम्ही परि-छिन्न चाकर ठेऊ नये. ते सरकारचे हुकुमाखेरीज गेले तर त्यास ताकीद करून फिरोन येत ते करावे.

*N* फिरंगीयाचा जो विचार करणे तो आमचे विचारें करावा.

¶*This paper enumerates the terms offered by the Peshwa to the Nizam after the latter's defeat at Udgir. The handwriting marked T is Trimbakrao Pethe's and that marked N is the Peshwa's.*

---

*No. 129*] [*Received on 20-2-1760*

पौ छ २ रजब बुधवार

श्री

विनंती उपरी. येथून दोन च्यार रोजात निर्गम होऊन कूच होईल. मल्हार नाइकास आज्ञेप्रा दाहा हजार फौज तोफखाना उद्या बोलून रवानगी करतो. वरकड सारी फौज मागले कूच करावे. आठ रोज बेदराजवल जाईल तो गंगातीर परली वगैरे या सुमारे असले पाहिजे. जानबा आपलें घरीं आहेत. त्याचा पुत्र पाठवणे तो बेदरापुढे जाईल. हणमंतरायास आपले भेटीस आणून मोगलाचा भला माणूस या घेऊन त्याचे नीट करून लाऊन देऊ. जानबा हणमंतराव आपलेसेच जाणावे. त्याचे गावखेडे आम्ही भांडून राखिले व घेत नाही. खंडागले लबाड. त्याचे गाव जागीर वाटेवरच आहे. मोकले होईल. जाधवराव कलतच आहेत. कांहीं महालहि जातात. हिदुस्तानची फौज आठ दहा रोज फोडतां येणार नाहीं. मग पुढे रवाना करून. दादाचे लाव जाणे

स्वामींची भेट होऊन जाले पाहिजे. स्वामी तुलेकरतां गंगातीरास येतील. तेथून पडतूरचे सुमारे गाठ पडावी. भोसलियाचा निर्गम करणे व दादाची रवानगी तेथून करावी. कर्नाटक व माहालोमाहाली पथके जाणे ते याच आठा रोजात जातील. आव्रसेपलीकडे मोंगल गेलियावर आम्ही घाट उतरावा. खाटी दरमजल येऊ. स्वामींचे येणे लौकर जाले पाहिजे. भोसलियासहि पाच सात रोजी बोलायाचे मुले लाऊ. जानोजी पाच सा हजार, मुधोजी दोन तीन हजार, करांडे हजार दीड येकूण सारे दाहा हजार होतील. बाबूराव कोनेरहि या आणावे. स्वामींची गाठ पडलियावर यांचा कारभार सेवटास जाईल. पाच लाख रुपये रवाना केले ते येऊन पावावे. ते व सात स्वामीजवळ आहेत, त्यावर रवानगी दोहीकडील होईल. माहाल नवे आले त्यांचे मामलेदार करार करून रसद होईल तोहि यैवज जमा होईल. माहादाजी गोविंद, गोविंद बलाल वगैरे मामलेदाराकडे यैवज पुढील दसरापर्यंत येणे फार, त्यांची निकड होत नाही. आजमासे पहिले केले ते मनास आणून पत्रे पाठवावी. काम पटल्या आसेच थोर मामलेदार त्याणी दाह लाख कर्ज का न द्यावे? आसो, चालते ते चालते. वारि-काची मात्र निकसी फार होती. पंधरा वीस लाख नवा खर्च देखील आताचे पाच येणार ते सुधा वीस होतील. पांच हजार नवी फौज, दाहाबारा लाख इभराम खानाचा खर्च वाढला. त्यास साठी लाखाचा मुलुख व स्थले आली. येंदाहि जसी व अखेरसालपर्यंत वीसपर्यंत वसूलहि येईलसे वाटते. हिंदुस्तानचा पेच नसता तर सर्व दक्षणच स्वामींची होती. आताहि निर्माल्यपणे दाहा बारा हजार फौज दाहा हजार माणूस इतके बल आहे. मराठे दाहा हजार आहेत ते आपले लगामी आहेत. आताहि जाला कारभार निभावला, फौजा रवाना झाल्या म्हणजे उत्तमच आहे.

¶*This is a wholly autograph letter by Sadashivrao Bhau to the Peshwa offering his views on the provision of funds and troops for the northern expedition. It is quite clear that until the famous deliberations of Patdur took place, it was Raghunathrao who was intended to lead the expedition against the Abdali.*

---

*No. 130*] [*1760*?

श्री

श्रीमंत राजश्री पंत प्रधान
स्वामीचे सेवेसी

विनंती आज्ञांकित गोपाळराव केशव कृतानेक सां नमस्कार विज्ञापना ऐसीजे. नवाब निजामअलीखान बहादर याजकडील माहाली सरकारचा स्वराज्याचा यैवज

पुढील दक्षणा वगैरे जमा करून जामदारखाना करावा. देवास खर्च करावा. कर घेऊच नये. करार खर्च आसेल तो जाहागिरीत करावा. तेथे मद्याचा प्रवात फार तो उतम नाहीं. यास्तव येक कलाल ठेऊन देवीस नैवेद्य मात्र किंचित देत जावा. वरकड कोणी पिणे आगर घेणे करूं नये. येणेप्रो करावे. येविसी नैवेद्यास मात्र मद्य द्यावें. देवीसहि पुसावे, नाही म्हणत नाही, मद्यदेखील सर्व करावें. जानबा पुजाराने नच देत तर सरकारातून द्यावा.

नव्ये जाहागिरीत रोज वर्षासने सेते वगैरे धर्मादाव ब्राम्हणाचे आसतील ते पेशजीप्रो शोध करून चालवावे म्हणून सर्वा कमाविसदारास ताकीद करावी. समानचे जागिरीत नाइकानी निमे केले आहे, परंतु हलीचे जागिरीत भोगवटा आसेल तो धर्मादाव खैरात सगळीच चालवावी. थोडा आर्थ आहे.

तालुकदारास सागून कर सोडवावे

१ माहूर कवडे

१ तुळजापूर व माणकेश्वर व सोनारी जानबा

१ नळदुर्ग सरकारातून

१ प्रमर (?) विठल सुंदर येणेप्रो कर सोडवावे. माहूरची सनद आहेच, वरकड आपलेच आहे. विठल सुंदराने कबूल केले आहे.

१०००० दहा हजार देवावे. काम जाहलियावर द्यावे. काम होईल तेव्हा करावे. सिंदखेडाजवळ देऊळगाव वेंकटेशाचें गाव थोर आहे, तेथे हजार दोन हजार ह्यापर्यंत देवाची पूजा वगैरे व्यवस्था जालनापूरच्या कादारानी करावी, करवावी. यास्तवच गांवचे जरूर करवावे. चांगले स्थळ आहे.

वेंकटेशास तूर्त कडेपेकराकडून पाच हजार ह्याचे तुलसीपत्रें आगर आणिखी पदार्थ सुवर्णाचा करून आर्पण करावा. येथून सनद भगवंतपंत व विसोबाकडे पाठविली. तेथून ताकीद करून शोध करावा.

येलगदल सरकारांत राजेश्वर आहे. हकीमजीची जाहागीर करार केली त्यांत तो गांव आसलीयास हकीमजीस मोबदला देऊन तो गाव घ्यावा आणि आर्धा येवज देवब्राम्हणास पावेसे करावे. हकीमजीच्या जाहागिरीत नसल्यास मोगलाकडे आसल्यास राहिले. हकीमजीकडे आसेल सरकारांत घेतले तर हे काम हरि दामोदराकडे सागावे. मोठे स्थळ आहे. मोगलाकडे आसल्या राहिले. हकीमजीकडे आसल्या जरूर करवावे.

चिरंजीव माधवरावजी यांस त्रिंबक जेजुरी कुरकुंब मोरेश्वर येथे दर्शनास पाठवावे. थेऊरी जावे. चिंचवडी देवाकडे जावें.

लोणार क्षेत्रीं दोन तीन देवास पूजा नैवेद्य नंदादीप व पंचवीस ब्राम्हणाचे अन्नछत्र करावे व तीर्थावर मसीद आहे ती पाडून टाकावी. हे काम कृष्णाजी गोविंद गोरे याजकडून करवावे. त्यास येथील कमाविस सुभा सन मजकुरी सांगितली आहे तेथून करार करून दिल्हा आहे. समाच्यार घ्यावा.

टोके गाव घेतला आहे तो बाबूजी नाईकाकडे देऊन काही देव व काही ब्राम्हणास पाहून वर्षासने करून सारा गांव तेथेच व्यये करावा. नाइकाकडे सनद दिली. बदोबस्त पुढील नेमून खर्च द्यावा. फडके यास विशेष नेमावे.

त्रिंबकी मुकुंदतीर्थापासून नरसिंह तीर्थ व तलेगावपर्येत प्रदक्षणेच्या वाटेवर झाडे लावावी. हे काम नारो-भगवंत देवळाच्या कामावर त्याकरवी करवावे. पंचवीस हातावर झाड लावावी. दुतर्फा लावावी.

नासिकचे चक्रेश्वराचे पटागण चक्रतीर्थी होत आहे ते त्रिंबकराव मामा करवी सेवटास लौकर न्यावे. कमरभर खडक फोडून गंगातीर्थात खोल करावी. दोन हजाराचे लाहन देऊळ चक्रेश्वराचे करावे. मामाकडून सारे करवावे.

कुशावर्त सिध जाहाले. पुढे चहूं-कडून घरे काढून वोवऱ्या पक्या कराव्या. राहूजीपंत करितील तर उत्तम, नाहीतर सरकारातून कराव्या.

केसोपंत पाटील नि॥ कृष्णराव मामा व सरकारचा कारकून देऊन कामे करवावी.

१ भीमाशंकर येथे जागा नेमून केसोपंतास दाखविली तेथे हजार दीढ हजारपर्यंत रुपये लाऊन धर्मशाळा बांधावी. नेहमी येक दोन ब्राम्हण ठेऊन देवास पूजा नैवेद्य नंदादीप चालवावा.

१ कमलजेपलीकडे तले आहे ते दाहाविसा हजाराचे काम आहे ते करावे.

त्रिंबकेश्वरी पूजा वगैरे बंदोबस्त केल्याप्रा नीट चाले ते करावे. हुजुरून समाचार घेत जावा. नारो आपाजी आगर त्रिंबकराव मामास सागून नीट चाले ते करावे. हुजुरून समाचार घेत जावा. नारो आपाजी आगर त्रिंबकराव मामास सागून नीट चालवावे.

नारो आपाजी उर्धो चीरेश्वर भिमा-शंकरचे कामास वाकीब आहेत. यातील कोणी पाठवावा. नेमून देऊन केसो-पंताचे हाते सेवा तेथील घ्यावी.

लाख पाऊणलाखपर्यंत काम आहे. नारो आपाजीनी आगर मामानी पाहून नीट बेत करावा. कुशावर्त चांगले बांधले, तसे बोवऱ्या विस्तीर्ण कांही घेरेहि जातील. त्यास यैवज देऊन करावें लागेल. येकजन्मी काम आहे. बहुतकरून रावजीपंत करितील, नाही तर सरकारांतून करावें. त्याणी केले तर बेतून सरकारातून द्यावे.

हरि दामोदर

परली वैजनाथीं मार्कंडेयतीर्थ चालीस गज रुंदी आसी गज लांबी आसेल, ते पायापासून नीट करावें. चांगले पनास हजारापासून लाखपर्यंत काम होईल. येथून सनद दिली, परंतु गवब्या व शाहाणा पाठऊन बेतून नीट द्यावे.

गंगा म्हसले येथे गणपति गंगेत आहे तेथे चऊथरा चांगला बाधावा. देऊळ नवे थेऊरी म्हातारीच्या डोहावर केले आहे तसे करावें. चऊथरा देऊल देवास पुसोन करावे. येक ब्राम्हण ठेऊन पूजा नैवेद्य नंदादीप चालवावा. दाहा पंधरा हजार लागतील जरूर करावें. आपूर्व स्थल आहे. हरि दामोदराकडे नेमोन सनद दिली आहे.

परली वैजनाथी देवाचा मला जानबाकडून जमीन घेऊन करावा. उपाध्ये आग्नहोत्री अयाचित यास घर देविल्याप्रो करून देवावी. देवास पूजा नैवेद्य

खेड त्रिसाद येथे गणपति नरसिंह येक दोन देव आहेत त्यास पूजा नैवेद्य नंदादीप ब्राह्मणभोजन दरसाल पाचशें रुपेपर्यंत करावा. सिवरामपंतानी करावें. चौकसी हरि दमोदरांनी करावी. याप्रो करावें. येथून सनद दिली आहे.

क्षेत्र मुदगल निा हरि दामोदर मुदगल पहिले चवथाई ब्राह्मणास आहे. हाली आणीक चवथाई ब्राह्मणास द्यावे. येकून निमे ब्राह्मणास जाहले. बाकी निमे सरकारांत राहिले, त्यांत देवास नैवेद्य नंदादीप करावा. गगेत पटांगण केले आहे ते पुर्ते थोडेसे वाढऊन करावें. गांवचे यैवजी करावें. फारच गंगा तेथे चांगली आहे. येक ब्राह्मणहि तेथे सेवेसी आसावा. सनद दिली आहे. पूर्णासंगमी कंठेश्वर माहादेव आहे त्यास पूजा नैवेद्य नंदादीप चालवावा. सनद दिली निा हरि दामोदर.

नेमिल्याप्रो चालवावा. सनद निा कवटे सनंद दिली. हरि दामोदर याणी परामृष करावा.

उवड व कुशतर्पण दाहा दाहा हजाराचे दोनी गांव आहेत, तेथे ब्राम्हण सिष्ट पाहून निमे द्रव्य ब्राम्हण देव यांची व्यवस्था करून द्यावी. हरिपताकडे गाव आहेत. मोवम सनद दिली. याची व्यवस्था कोणी तेथे पाठऊन करून द्यावी. ब्राम्हण फार, तेथे आहेत.

शुक्लतीर्थ पश्चमवाहिनी गगा निंबगाची आहे तो गाव हणमंतरायाकडून ध्यावा. आवघे हजार रुापर्यंत आहे, त्यात आर्धा गाव पाचसात ब्राम्हण गानी ठेऊन आग्रहार करावे. अर्ध्या यैवजी देवाची पूजा नैवेद्य नदादीप दोन च्यार देव आहेत त्याचे करावे. शुक्लेश्वराचे देऊळाचे सिखर हजार दीढ हजार रुा लाऊन करावे. देऊळ निंबाळकर हणमंतराव याचे फडनिसानी बांधलें. सिखर वगैरे काम आहे त्याची सनद हरि दामोदराकडे दिली आहे. येसाजीपंतास सागून गांव मागून घेऊन शंकराजी केशवास आगर हरि दामोदर यास सांगून आग्रहार व देवखर्च करावा. याप्रो जरूर करावे. हणमंतरायास देणे तर मुबदला द्यावा, परली हा गांव घ्यावा. त्याप्रो करावे.

मनरथ सुलतानजी निंबाळकराकडून घ्यावा. तेथील देव दोन च्यार आहेत. त्यास पूजा नैवेद्य नदादीप चालवावे. चतुर्वेदी वगैरे सिष्ट पाहून येक हजार पर्यंत रुाो धर्मादाव नेमून द्यावा. येसाजीपंतासहि सांगितले आहे. जरूर गांव घ्यावा अगर मुबदला द्यावा, परतु घ्यावा. याप्रो करावे हरिपंताकडे सनद दिली आहे.

नारायेणभट व शेषभट यांस हजार रुाचा गाव आबादात द्यावा. सदरहूची सनद आंबाडपैकी संकराजी केशवास दिली. ताकीद व्हावी.

गोविंदबावा विडात राहातात, त्यास तीन च्यारशे रुाचा गाव मानूर आगर आवाडात द्यावा सदरहूची सनंद आबाटपैकी शंकराजी केशव यास दिली. पाचश्याचा वसूल व तितकाच तनखा भवानदास व गोविंदबावा दोघे बंधू त्याचे नावे सनद मानूरपैकी दिली. तेथेच पाचशे रुपये याचा नेमून द्यावा.

नारो बाबाजी

भिगारचा शुक्लेश्वर याचे देऊळ बांधावे, पाण्यात आहेत. दाहा वीस हजार खर्च करून चांगले करावे. फार विशेष करणे नाही.

श्रावण मासीं ब्राह्मणास फार उपद्रव यास्तव पर्वतीस चौसोपी व मवले दिवसीं दाहा हजारपर्यंत आनं- भोजनास होईव समगावर धर्मशाला व भोजनाचे होई व कोरेगांव घोडनदी सिरवळ दोन च्यार जागा जागा नव्या चांगल्या करून घालाव्या. काम थोडे, परंतु नाश मोठा होतो यास्तव जरूर करावे.

लक्ष भोजन करविले ते सेवटास न्यावे. बहुतकरून जाले आसेल. शोध करून सेवट करावा.

राव आपाचे वेळेस गावोगाव दाहा वीस शान्यात करून आंबे लाविले ते जाले. पुढे आगदी न जाले, त्यास जुनर पुणे खानदेश गंगथडी बालेघाट सर्वत्र ताकीद आसावी. गांव पाहून से दोनसे झाडे वर्षास लावावे. दाहा वीस शान्यातहि करावी. दाहा वीस हजार जमा कमी होईल, परंतु आंबराई फार होईल. यात लौकिक व पुण्य आहे व कोणाचाहि द्वेष नाही. उत्पन्न होईल.

¶*This very interesting extract copied from a rumal in the Ghadni Section, enumerates the offerings promised by the Peshwa to propitiate the various famous deities in the South in order to invoke their blessings and grant success to the Maratha arms against Afghan invaders. It is evident what a burden of anxiety the Peshwa was labouring under at the time when Sadashivrao Bhau started on the expedition. It is also clear that the Peshwa at that time intended to send Raghunathrao from the South to support Bhau with fresh troops. Apparently the Peshwa relied on divine favour as much as on his splendid preparations for a successful termination of the momentous issue*

---

*No 133]* *[5-9-1760*

आसल बा नकल

श्री

राजश्री धनसेट करंजे गोसावी

यांसी

॥ अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्री बालाजी बाजीराव प्रधान आसिर्वाद सु॥ इहीदे सितैन मया व अलफ. तुम्हापासून कर्ज घेतले मुदल मित्या रु॥

४९६६८॥· मिती श्रावण शु॥ १

२२२४५॥।· मिती मार्गसीर्ष शु॥ बा व्याज

७२९१४।·

रामपुरीकर दयालबावा यास आंबाड परगणियांत पाचशे रुपयांचा गाव इनाम जवळपास नेमून द्यावा. सनद दिली.

कृष्ण जोसी संगमेश्वरकर यांस पांचशेपासून सातशे रुपावेतो गाव गंगातीरी द्यावा. निघतेसमई चागले जाहले तरी द्यावा आसे वचन. सबब सदरहूची सनद पा। नासिकांत गंगातिरी नासिकच्या कमाविसदारास दिली. ताकीद करावी.

नारो आपाजी

मोरेश्वरी स्थलाची संये करून नगारखाना घालावा. खर्च सुभाकडे नेमून द्यावा.

जेजुरीस देवास पाचशे रुाचा गांव धारवाड तालुक्यांत सन सबात दिल्हा तेव्हापासून यैवज पावला न पावला शोध करून पाववावा. नवा गाव सन मजकुरी पासून गंगातीरी नारो बाबाजीकडून पाचशे रुाचा द्यावा. त्याचाहि यैवज येकूण दोन्ही यैवज देवास येथास्थित पावतसे करावे. गाव नेमून देउन पत्रे सनदा करून द्याव्या. गंगातीरी नारो बाबाजीकडे नेमून गाव घ्यावा. यैवज दोहीकडील नारो आपाजीनी पाहून काही नग दागिना आगर जे करणे ते समाचार घेऊन करीत जावे.

तुलापुरी नेमिले जागा वाट बांधून त्यावर लाहानसे देऊळ च्यार दिवाळी लांकडी वोवऱ्या कराव्या. देवघरात आमचे लिंगाजवळ बाण आहे तो स्थापना करावी. पूजा नैवेद्य नंदादीप पंचवीस चालीस ब्राह्मणांचे अंनछत्र चालते करावे. चालीस पंनास हजार रुा पावेतो काम करावे. गुा काम लागले सेवट करावा.

पुण्याहून पाशाणेपर्यंत विठलवाडीपर्यंत कातरजपर्यंत आलंदीपर्यंत थेऊरपर्यंत वाटेवर झाडे पिपर वगैरे लावावी. पनास हतावर झाडे लावावी. प्रेत्न थोडा, उपकार फार, यास्तव जरूर याप्रो नारो आपाजी जिवाजीपंताकडून करवावे.

6966

नारो बाबाजी

भिगारचा शुह्रेश्वर याचे देऊळ बाधावे, पाण्यात आहेत. दाहा वीस हजार खर्च करून चांगले करावें. फार विशेष करणें नाहीं.

श्रावण मासीं ब्राह्मणास फार उपद्रव यास्तव पर्वतीस चौसोपी व मवले दिवसीं दाहा हजारपर्यंत आनंभोजनास होई व संगमावर धर्मशाला व भोजनाचे होई व कोरेगांव वोडनदी सिरवल दोन च्यार जागा जागा नव्या चांगल्या करून घालाव्या. काम थोडे, परंतु नाश मोठा होतो यास्तव जरूर करावें.

लक्ष भोजन करविले ते सेवटास न्यावे. बहुतकरून जाले आसेल. शोध करून सेवट करावा.

राव आपाचे वेलेस गावोगाव दाहा वीस खान्यात करून आंबे लाविले ते जाले. पुढे आगदी न जाले, त्यास जुनर पुणे खानदेश गंगथडी बालेघाट सर्वत्र ताकीद आसावी. गांव पाहून से दोनसे झाडे वर्षास लावावे. दाहा वीस खान्यातहि करावी. दाहा वीस हजार जमा कमी होईल, परंतु आंबराई फार होईल. यात लौकिक व पुण्य आहे व कोणाचाहि द्वेष नाही. उत्पन्न होईल.

¶*This very interesting extract copied from a rumal in the Ghadni Section, enumerates the offerings promised by the Peshwa to propitiate the various famous deities in the South in order to invoke their blessings and grant success to the Maratha arms against Afghan invaders. It is evident what a burden of anxiety the Peshwa was labouring under at the time when Sadashivrao Bhau started on the expedition. It is also clear that the Peshwa at that time intended to send Raghunathrao from the South to support Bhau with fresh troops. Apparently the Peshwa relied on divine favour as much as on his splendid preparations for a successful termination of the momentous issue.*

---

*No 133]* *[5-9-1760*

आसल बा नकल

श्री

राजश्री घनसेट कांजे गोसावी

यांसी

ॐ अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य श्रा बाळाजी बाजीराव प्रधान आसीर्वाद सुा इहीदे सितैन मया व अलफ. तुम्हापासून कर्ज घेतले मुदल मित्या का

४९६६८॥· मिती श्रावण शुा १

२३२४५।।।· मिती मार्गसीर्ष शुा बा व्याज

---

७२९१४।·

येकून बाहातर हाजार नवसे सवा चवदा रुो, यास व्याज दरमहा दरसद रुा १ येकोत्रा सिरिस्तेप्रा करार केले असे. जाले मुदतीचे व्याज व मुदल हिसेब करून देऊ. शके १६८२ विक्रमनामसवत्सरे जाणिजे छ २४ मोहरम आज्ञा प्रमाण.

¶*Balaji Bajirao Peshwa gives this bond in writing for having contracted a debt of Rs. 72,000 from Ghanshet Karanje at an interest of 1 per cert. per month.*

---

*No. 134*] [*19-10-1760*

असलबा नकल

श्री

अखंडितलक्ष्मीआलंकृत राजमान्य
राजश्री खंडेराव रामचंद्र गोसावी यांसी

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार सुहूर सन इहिदे सितैन मया व अलफ तुम्हापासून कर्ज घेतले मुदल रुा

२४१०० छ १२ रावल
५५३५० छ १३ रावल
५५० छ १४ रावल

८००००

यैकूण ऐसी हजार रुा घेतले यास व्याज दरमाहे दरसदे रुपया १॥≈ येक रुपया चवल सिरस्तेप्रमाणे करार केले आसे. जाले मुदतीस व्याज व मुदल हिसेब करून देऊ. शके १६८२ विक्रमनाम सवछंर जाणिजे छ ९ रबिलावल

खताची नकल मारनिलेनी आणून दिल्ही. छ
४ जिल्हेज सन खमस सितैन,

¶*The Peshwa borrows Rs. 80,000 from Khanderao Ramchandra at the rate of Re. 1 As. 2 per cent. per month.*

---

*No. 135*] [*14-10-1760*

छ ७ रबिलोवल

श्री

पुरवणी राजश्री नाना
पंडित प्रधान गोसावी यासी

विनंती उपरी. शामलावरी सरकारातून मोहीम जाहाली आहे यामुळे इंग्रेज आदिकरून टोपीकरास विग्रण असावे ऐसे नव्हते. इंग्रेजांची तरी सर्व प्रकारे

सरकारातून पुस्तपन्हा होऊन बाणकोटासारिखा जागा करून दिल्हा असता त्याचे करतुत्व या रीतीने रुपास यावे येसे नव्हते. आलें तेव्हा गोवेकर फिरगीयाची खातमी अप्रमाण कशावरून म्हणावी ! फिरगीयासी वेध आहेच. वलंदेजाने जंजिरा आश्रये धरून मालमलियेत सावकारीस आणिली असता, इंग्रजाचे मनोगताकरिता बद केला होता. इंग्रेजावरी येहसान सर्व-प्रकारे असता इंग्रजाने सत्य सोडिले. तेव्हा फिरंगी, वलंदेज तरी काल्लेच आहेत. याजकरिता इतक्याचाहि उपमर्द आसिला पाहिजे. फिरंगीयाची जड गोवे, वलंदेजाची जड सुरत व शामल तेथे प्रत्यक्ष आहेच. अथ:पर गोवे, सुरतकडेस फौजाचा नेहट व राजपुरी उंदेरीस हशम फौज हुजुरून येणार. त्यास अथ:पर आवकाशावरी खानगी नसावी. सुरतेवरी मुख्य नेहट फौजाचाच पाहिजे. सरकारचे आरमार गेले आहे व जाईलच. ; तथाप टोपीकराचा संकेत शामलाकडेस आणि तरांडीहि वारेयावरी आसत, आणखी जाता विलंब नाहीं तेव्हां परस्परे आरमाराची गाठ दर्यातच पटोन राहील. मुख्य गोष्ट सुरतेतील शामल इंग्रेज वलंदेजदेखील उखळून काढणे हा जोरा फौजावरी आहे. हेविशी पंत मारनिले याणी सेवेसी लिहिलेच आहे. रा छ ४ माहे रावल. बहुत काये लिहिणे कृपा केली पाहिजे हे विनंती.

*¶The Peshwa is informed of the dangerous attitude of the English, and the Dutch who intend joining the Sidi against him. The Peshwa at this time sent an expedition against Janjira but was thwarted in his designs by the English.*

---

*No. 136*] [*16-4-1761*

छ २१ रमजान इहिदे

श्री

श्रीमत राजश्री बापू

स्वामीचे सेवेसी

पोष्य नारो त्र्यंबक मुा जंजिरे विजयदुर्ग साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशळ ताा छ १० रमजानपर्यंत जाणून स्वकीये लेखन करीत असावे विशेष. राजपुरीकडील वर्तमान तरी खुशकीने व आरमाराने सर्व मोर्चेबंदी होती व कासा याजवर गुराबानजीक भिडऊन मारगिरी नेटबाजीने होत असतां, इतकेयात फिरंगियाचे आरमार आणविले होतें, ते अंजणवेलीचे बाहेर आलें. हे वर्तमान इंग्रजाने येकतांच आपले आरमारसुधां जलदी करून जंजिरेयास आला. त्यावरी शामलाने इंग्रजाचे काहीं थोडे लोक व निशाणें येसीं जंजिऱ्यावर व कांशावर घेऊन निशाणे लाविलीं, व सामान सरंजाम दोनी किल्यावर चडविला आणि

इंग्रजानें दोनी * * * चा बंदोबस्त करून राहोन सांगोन पाठविलें * * * जागे आपले ताबीन जाहलें आतां * * उन निघोन जाणें पुढें श्रीमंतांच * * * * आम्ही निभावणी करून द्यावया * * * * * सतां तुम्ही मोर्चे उठविले नाहीं * * * * * परिछिन काय नासेल बखेडा तुम्ही * * * * श्रीमंतांचा शब्द तुम्हास लागेल म्हणून आला * * * गोन पाठविले. त्यावर तेंव्हांच त्यासी कज्या करावा तरी * * * ची आज्ञा नाहीं, तेव्हां इकडून इंग्रजास सांगोन पाठविले जे, हुजूरचे आज्ञेविना मोर्चे उठवितां येत नाहीं. तुमचे चितांत काय करणे असेल तें करणें म्हणून साफ सांगितल्यावर त्याणे हुजूराचा जावसाल यावयाकरितां पंधरा रोजांची मुदत केली व फिरंग्याचाहि आशय मनास आणित्तां, इंग्रजाची निशाणें किल्यावर चडली, आता आपण मारगिरी करीत नाहीं म्हणून. तेव्हां हे सर्व वर्तमान राजश्री रामाजी विश्वनाथ व राजश्री रामाजी माहादेव यां उभयतांनी हुजूर पुण्यास लेहून पाठविले. त्यावरी तेथून आज्ञा आली जे, यासमयी इंग्रजासी विघाड करितां येत नाहीं. पुढें जैसे करावयाचें तैसे केले जाईल. तुम्ही मोर्चे उठऊन तेथून निघावयाचे करणे म्हणून, त्यावरून सर्व जमाव व अरमारें देखील तिकडील तिकडे गेले. यावर मागाहून आम्हीहि आरमारसुधा तेथून निघालो ते छ ३ रमजांनीं विजयदुर्गी येऊन दाखल जाहलों, येविसींचें सविस्तर वृत श्रीमंतास लिहिले आहे त्याजवरून अवगत होईल. सर्व प्रकारें आम्ही आपले आहो. तदनरूप आपण ममतायुक्त परामर्श करीत असावें. तूर्त राजपुरिचे मोरचे उठले. स्वामीस कळावें. बहुत काये लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती.

¶*Naro Trimbak writing from Vijaydurg reports to Sakharam Bapu that he was forced to raise the siege of Janjira by the English and return to Vijaydurga.*

---

*No. 137*] [*31-12-1760*

पौ छ २३ जमादि-
लोवल इहिदे सितैन.

**श्री**

सेवेसी हरि बलाळ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ २२ जमादिलोवल मुकाम मौजे धणगर टाकळी परगणें नांदेड वर्तमान यथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान तर निजाम अली ठिकाणीच आहेत. कृष्णराव बलाळ व मुरादखान पोहचलियावर पत्र आलें नाहीं. श्रीमंत मागे राहून राजश्री

सखाराम पंत बापू यासी पुढें निजाम अलीकडे कांहीं फौज देऊन रवाना करणार. याणी पुढें जावें, मोगलास भेटावें, बोलोन चालोन श्रीमंताकडे घेऊन यावे म्हणजे मग बोलण्याचा गुता नाही. तडक हिंदुस्थानांत जावें असा मजकूर होत आहे. निश्चयांत येईल ते सेवेसीं लिहून पाठवीन. हे विज्ञापना.

¶*Hari Ballal writes about the Peshwa's earnest desire to proceed northwards after interviewing Nizam. Ali. Sakharampant, he adds, has been deputed by the Peshwa to bring him for an interview.*

---

*No. 138*] [*6-1-1761*

असल वा नकल

श्री

राजश्री घनसेट करंजे गोसावी

यासी

ॐ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य श्री बालाजी बाजीराव प्रधान आर्सीर्वाद सुा इहिदे सितैन मया व आलफ. तुम्हापासून कर्ज घेतले मुदल आरकटी रुो

१६८०९ छ २४ जमादिलावल मार्गसीर्ष शु १२
शके १६८२ विक्रमनाम संवत्सरे
१६४०० छ २५ जमादिलावल मार्गसीर्ष वद्य १३
१७९१ छ २६ जमादिलावल मार्गसीर्ष वद्य १४

३५०००

येकूण पस्तीस हजार यास व्याज दरमाहा दर सदे रुपया १८= येक रुपया चवल सिरिस्तेप्रा करार केले आसेत. जाले मुदतीचे व्याज व मुदल हिसेब करून दिल्हा जाईल. जाणिजे छ २८ जमादिलावल आज्ञा प्रमाण.

¶*Balaji Bajirao passes a bond to Ghanshet Karanje for a loan of Rs. 35,000 contracted at an interest of Re. 1-2-0 per cent. per month.*

---

*No. 139*] [*January 1761*

श्री

राजश्रिया विराजित राजमान्य
राजश्री मोरो बाजी स्वामी
गोसावी यासी

पोष्य कासी नानाजी आर्सीर्वाद विनंती उपरी. तुम्हीं पत्र पाठविले ते प्रविष्ट होऊन लेखनार्थ आवगत जाला. विशेष पत्री मजकूर रा मलारबा व खंडोबा

व भाव्बा व बरकड इष्टमंडली याचे वर्तमान लिहिणे. त्यास रा मलारबा व पागा दोन व बरसेयाचे कमावि(स)दार येसे ग्वालरीस पोहचले, तो हिंदुस्थानचे फौजेवर ईश्वरीक्षोभ जाला हे वर्तमान त्यास मुकाम मजकुरी कळले, त्यावरून ग्वालेरीसच राहिले. तों दो चौ दिवसानी पळ लस्करचा आला. चिरंजीव रा तात्या घोडी दोन व माणसे दोन येसे रा मलारजी होळकर याजसमागमे भिंडेस सुखरूप आले. रा खंडो भगवंत व बाजी बापूजी व भावबा व आपाजी मलार वगैरे कारकून मडळी व सर्व इष्ट मंडळी येसे सर्वथा हारण होऊन ग्वालेरीस आले आहेत. रा येशवंतराऊ पवार सुखरूप आहेत म्हणौन रा गंगाधर येशवंत याचे पत्र आली तेथें लिहिले आहे व रा गोपाळ संभाजीचे पत्र आले तेथेहि लिहिले आहे. कृष्णगडी क्षेमरूप आहेत येसी शुभ त्याची वर्तमाने येतात. श्री कृपा करून संरक्षण करून आणील तो सुदिन आसे. सर्वदा साकल्यलेखन करून संतोषवीत जावे. लोभ कीजे हे विनंती. पौो लक्ष्मण कासी आसीर्वाद विनंती. सदैव सांभाळीत आसावे. राजकी वर्तमान आइले तर लिहीत जावे. लोभ आसो दीजे हे विनती.

¶*Kasi Nanaji writing to Moro Baji describes the condition of the fugitive Maratha army after its defeat at Panipat.*

---

*No. 140*] [*20-2-1761*

**श्री**

अखंडितलक्ष्मीआलंकृत राज-
मान्य राजश्री मोरो बलाल पटव-
र्धन गोसावी यासी

सेवक बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार सुहूर सन इहिदे सितेन मया व आलफ. तुम्हापासून कर्ज घेतले. मुदल रुपये

| | |
|---|---|
| १६००० | जुने पंचमेल |
| ८४००० | अर्कट |
| १००००० | |

येकूण येक लक्ष रुपये घेतले. यास व्याज दर माहे दर सदे रुपया १ येकोत्रा बीन सुटप्रमाणे करार केले असे. जाहाले मुदतीस व्याज व मुदल हिसेब करून देऊ. मिति माघ वद्य प्रतिपदा शके १६८२ विक्रमनाम संवत्छरे जाणिजे छ १४ रजब बहुत काय लिहिणे.

वार

¶*Balaji Bajirao incurs a debt of one lakh from Moro Ballal Patwardhan at 1 per cent. interest per month.*

No. 141] [7-5-1761

पौ छ १३ जिल्काद
जेष्ट इसने

## श्रीराम

श्रीमंत राजश्री नाना पुरंधरे स्वा-
मीचे सेवेसी

सेवक गणेश वेदांती मुकाम श्रीमथुरा सां नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल ता छ १ माहे सवाल मुकाम मजकूर सेवकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष. स्वामीनीं कृपा करून पत्र पाठविलें ती छ २९ रमजानी पावली. लिहिले वर्तमान कळो अला. स्वामी सरकारातून वराता राजश्री गणेश संभाजी व रुपये चऊशाची व राजश्री बालाजी गोविंद याजवरी रुपये चउशाची पाठविली. यां रुपये आठाशाची पाठविल्या. यैसियासी पूर्वी स्वामीनी राजश्री बाळ गोविंदावरी वरात करून पाठविली, त्यास कपर्दिक प्राप्त जाली नाहीं आणि मागती स्वामीनीं उभयेता मशारनिल्हेवरी वराता पाठविल्या. यैवज हातास आलियाणे उतम आहे. यैसियास आम्ही उभयतां मशारनिल्हेकडे वराता पाठविल्या आहेत. तेथून यैवज हातास आलियांं उतर पाठऊन देऊ. यानंतर पूर्वी स्वामीनीं बाळ गोविंदावर वराता रुपये आठाशाची पाठविली त्यापैकी आम्हीं राजश्री आयोध्याप्रसाद यानी वरात आयोध्याप्रसादास देऊन पैका येथे घेतला. त्यापैकी रुपये ४०० च्यारशे घेतले. तरी स्वामीनीं कृपा करून मशारनिल्हेस यैवज देवावा. त्याणे वराता स्वामीकडे येतील तरी त्याचा यैवजाची निशा करून देनार स्वामी समर्थ आहेत. यानंतर शाहाजादा क्रमनाशावरी आला आहे. यकुबअलीखान[+] दिलीस जाणार आहे. स्वामीकडे येणार होता. फिरोन दिलीस जाणार. श्रीमंत राजश्री गंगोबा तात्या व राजश्री चिंतोबा तात्या मुकाम मजकुरी आहेत. कुग वगैरे महाल यामधे आमल आपला चालतो. नबाब सुज्यातदौला आयोध्या प्राती गेला. सेवेसी श्रुत जाले पाहिजे. बहुत काये लिहिणे कृपा लोभ असो दीजे हे विनंती.

¶*Ganesh Vedanti writes to Nana Purandare from Mattra on the subjects of money drafts drawn in his favour and reports the movements of the Crown Prince, of Suja-ud-Daula, Gangoba Tatya and others.*

+ Abdali's ambassador.

लेखन करीत असिले पाहिजे विशेष. बहुत दिवस आपणाकडून पत्र येऊन कुशलार्थ कळत नाहीं तरी येसें न करितां पत्रीं परामृष करीत असावे. यानंतर राजश्री बाबाजीपंत आपणाकडून आले. त्यास मार्गी व्याक्षेप मदगिरी येथे सवा महिना जाहाला होता. श्रीनिवासराव कारकुन दिा बच्याजी सेटे हे न पुसतां निघोन गेले होते. त्याकरितां बच्याजी सेट्याने मदगिरीकरास लेहोन पाठविले. श्रीनिवासराव व बाबाजीपंत संगतीने येत होते त्याबदल गडकरी याणी अटकाविले. त्यास कितेक प्रेत्न करून तेथून निघोन आले ते वैशाख वद्य ९ पंचमीस येकोडीचे मुकामी येऊ(न) भेटले. त्यांची चिंता न करावी. याउपरी देशास जाऊन सर्वांस भेटोन आपल्याकडे येतील. वरकड दरबारचे वर्तमान राजश्री दादा स्वामींनी लिहिले आहे त्यावरून कळेल. हिंदुस्थानाकडील वर्तमान विपरीत बहुत लोक गेले. श्रीमंत राजश्री भाऊसाहेबाचा आद्यापहि थाक लागला असें नाहीं. थोर घात जाहाला. येक वेळ त्यांचा थाक लावणार श्री समर्थ आहे. तुंगभद्रेचे मुकामी येक महिना या लस्करचा मुकाम होता. चिकबाळापूर गुमनाईवाले खंडणी बुडाली. रायदुर्गाचा पैका हा कालवरी आला नाही. भुकणजी पुणेयास पटणाहून गेले. सरकारचे हुंड्या केल्या त्याचा यैवज त्यास मिळत नाही म्हणतात म्हणौन वर्तमान आहे. त्या प्रांते अर्जीजखान याणी उत्पाद मांडला म्हणोन वर्तमान आले. याकरिता साहित्यपत्रे आपल्याकडे श्रीमंतानी पाठविली आहे. दिवसेंदिवस काळ दुर्घट आहे. आपण बहुत सावध असावे. कोणाचा विश्वास न धरावा. उभयता आपण परोपकारी आहेत. सर्व संकटे श्रीकृपेने परिहार होतील, परंतु सूचनार्थ लिहिलें आहे. तेथील वस्तभाव माया असेल ते हुसकोटे या प्रांतेच असावी. पत्री परामृष करीत असावे. आमच्या चिरंजिवाची आसामी. कारकुनाचे हाते सेवा घेऊन चालवावे आपल्या भाग्याचा विभाग आहे. राजश्री सुबाराव व खंडेराव यांचे सर्व प्रकारे चालवावे. कोनेरराव दिा हसनखान व दिलेलखान व भास्करराव दिा मावलें हे आमचे आहेत. दया करून चालवावे. सुज्ञाप्रति विशेष काय लिहावे. लोभ निरंतर असो दीजे हे विनंती. सेवक बाबाजी आनंत साष्टाग नमस्कार लिा परिसोन कृपा कीजे हे विनती.

¶*Baji Ballal in the employ of Visajipant Biniwale who was in Karnatak writes to Ganeshpant Baba and Bhikajipant Daji reporting the condition of affairs in the South, at the time when the Marathas were returning from Panipat. The letter mentions several persons who were acting in the southern region.*

No 146] [1761 ?

श्री

सेवेसी भगवंतराव सिंदे नामजाद किले माहुली विज्ञापना. किले मजकूर हा किल्ला आमचे आजे मानाजी सिंदे व मोरोजी सिंदे यांणी पेशजी मोगलाकडे होता तो सरकारआज्ञेवरून मोठे मेहनत करून मैदानें सरकारात घेतला. त्याजवरून श्रीमंत थोरलेयानी बाजीरावसाहेब व आपासाहेब यांणी आमचे वडिलांकडे किल्ला सांगितला. त्याजवर वसईनी ममलत करून साहेबाची स्वारी. वसईस गेली त्यापासून आजतागाईत एकनिष्ठपणें स्वामीचरणाचे लक्ष धरून सेवा करीत आलो व साहेबानीहि कृपा करून चाकरी घेतली. त्याजप्रमाणें पुढेहि स्वामींनी कृपाळु होऊन आमचे चालविले पाहिजे आणि तालुक्याचे दरकदार मनस्वी बखेडा करून आम्हावर आदावती करितात, येविसी त्यांस ताकीद होऊन बंदोबस्त करून देणार स्वामी समर्थ आहेत. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

¶Bhagwantrao Sindia requests the Peshwa to put an end to the harassments he is subjected to by his subordinates and leave the entire management of the fort Mahuli to himself which place he says was captured by his ancestors with great exertions from the Mughal.

---

No. 147] [1761 ?

श्री

श्रीमंत माहाराज राजमान्ये

राजश्री पंत प्रधानसाहेबाचे सेवेसी

सेवक आत्माराम राजाराम साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून छ २१ जिल्हेजपरियेंत समस्त सुखरूप असो विशेष. साहेबी जाते-समयी ताकित केली की खबरदार राहणें व पोरींची निगा करणें. तालीम उतम प्रकारे करवीत जाणे. त्यासी खाणे जेवणे उतम प्रकारें होत आहे व गायनाची तालीम उतम प्रकारें कासिम पांच सात घटका देत आहेत व फकीर महम(द)हि तालीम उतम देत आहे. परंतु नाचावयाची तालीम नटवे सुधी देत नाहीत. येक घटकाभर टी टी करितात, आण पोरीस मारितात, आणि उठोनी आपल्या घरास जातात. आम्ही व भवानजीने सांगितले की नाचावयाची तालीम सकाळची पाच सात घटका व सांजेची पाच सात घटका देत जाणे येसें सांगितले. त्यांसी ते म्हणतात की तुम्हास काही कळत नाही. आम्ही घटकाचभर तालीम देऊ. माहाराजास कळावे म्हणून लिहिले आहे. कळले पाहिजे हे विज्ञापना.

¶Atmaram Rajaram, the Peshwa's Manager of the Music Department, reports how the dancing and singing girls were being instructed in those arts.

0977

No. 148]
पो छ २ रजब

श्री

राजश्री त्रिंबक रावजी
गोसावी यांसी

दंडवत विनंति उपर, तितर सुमार २० वीस पाठविले आहेत. घेऊन बागात सोडावे. काही श्रीमंताकडील वर्तमान आले असल्यास लेखन करावे. बहुत काय लिा लोभ असो दीजे हे विनंति. ताजा कलम तितर च्यार दिवाळीच्या बागात सोडिले तरच राहातील व तमाशा दिसेल. रमन्यात सोडिले तर द्रिष्टीस पडनार नाहीत. कलावे हे विनंति.

¶*The writer sends some twenty tittir (partridge) birds and asks Trimbakrao to keep them in a garden.*

---

No. 149]

श्री

श्रीमंत राजश्री पंतप्रधान
स्वामीचे सेवेसी

आज्ञाधारक कर्णाजी सिंदे नामजाद किले माहुली सां दंडवत विनंति. ताा छ ४ माहे रजब पावेतो स्वामीचे कृपेकरून सेवकाचे व किलेमजकूरचे वर्तमान येथास्तित असे. यानंतर स्वामीचे आज्ञापत्र सादर जाहाले तेथे आज्ञा की सांब्रे व चितले भेकरी व मोर व डुकरे गवे बच्याचे प्रयोजन आहे. लोक रानात पाठऊन बच्याचा तलास करून बचे जिवंत धरून जो जिनसाचा बचा सांपडेल तो जिवंत धरून जतनेने येऊन पोहचे ते करणे, म्हणून आज्ञा. त्यास आज्ञे-प्रमाणे लोक रानात पाठऊन तलास करून जे मिळतील ते सेवेसी रवाना करून. गव्याविसी मागे आज्ञापत्र आले होते त्यातागाइत न्या तलासात आहो. चाकरी घडोन येईल ते खरे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना.

¶*Karnaji Sindia writes to the Peshwa that, according to instructions, he is on the lookout for the animals and birds mentioned in his despatch and that he would send them as soon as he secures them.*

---

No. 150]

श्री

सेवेसी विनंती. सौभाग्यादिसंपन्न मातुश्री गोपिकाबाई श्रीहरिहरेश्वरास जाणार याजकरितां सार्द्यापैकी लोक आले आहेत. त्यापैकी शंभर माणूस सत्वर वाईस

सेवाचाकरी करीत आहों. खान मारनिल्हे मेहनत फारच चांगली करितात. जवार व गंभीरगड घेतला. जवारचा राजा पळोन रामनगरचे रानांत गेला. त्याचा सूड काढावयासी विचारांत आहेत. कोल्यावर सलाबत यांची मोठी पडली. इकडील बंदोबस्त (यांच्या)खेरीज होणार नाहीं. व ठाणी * * * लोक असावे त्याचा तपसील लिहिल्या त* * * * ऐशास खान मार जवामर्दी करून कोळ्यांचे पारिपत्ये करितील येसे जाणूनच त्यांची रवानगी केली. त्याप्रमाणे त्यानी आमलांत आणिलें हे गोष्ट उतम केली. प्रस्तुत कोळी रान धरून राहिले आहेत, सरकारच्या फौजा आल्यावरी फिरोन कोळी लवाडी करावयासी चुकणार नाहीं, याजकरितां त्यांचा सूड काढून हजार पांचसे कापून कादावे म्हणजे पुढें लवाडी करणार नाहीं. आवघी रयेत लवाडीस मिळाली होती. फौज तिकडे गेली याजमुळे ते रान सोडून रयेत म्हणून येऊन भेटत असतील, यास्तव त्यांची बारकाईनें चौकसी करावी. जे हल्यास मिळाले असतील त्यांचे पारपत्ये करावे. याप्रमाणे मनास आणून खान मारनिल्हेस सागून करवणे. जाणीजे. छ २२ रबिलाकर. आज्ञा प्रमाण. दुर्जनसिंग जवारकर रामनगरकर यासी मिळोन उत्तेजन देऊन कोलियाचें खोड केले असे सर्वप्रकार आहे म्हणोन ऐकतों. त्यास हे कसे आहे. दुर्जनसिंग यांस मिळोन सरकारनुकसान करणार नाहींत, यांत त्यांस नफा नाही. तत्रापि ते कसकसे यांसी मिळोन त्याणी यांस उत्तेजन कसकसें दिल्हे हें खरें लेहून पाठवणें. कोलियाचे पारपत्यास सर्व प्रकारे याउपरी उपेक्षा न करावी. त्यास जवार घेतली. रामनगरवाले यांचे पारपत्ये जरूर करावें त्यास रामनगर जागा वलकट कसी आहे, घ्यावयासी महिना दोन महिने पांचसात हजार फौजेस लागतसे आहे कीं सलाबतीनें फार दिवस न लागतांच येईसे आहे, तें सर्व माहीतगारीनें लिहिणे, आणि चिरंजीव नानास लेहून पाठवणे ते याची तरतूद करतील. मुख्ये गोष्ट ज्याजवर जरब बसवावी. ज्याजवर जरब न बसे त्यांस उत * * हमवार करून त्यांजपासोन मातबर नजर घेऊन पुढे लवाडी न करीत असें करावे. या फितुरांत मुख्यत्वे जवारकर त्याचें तों पारपत्य उतम करावे. रामनगर याचे साध्ये असाध्ये पाहून करावे. जर साध्ये आहे तरी उसीर करू नये. चिरंजीव नानाहि त्याचे रोखे येतील. आणिखी फौजा येऊन करितील. नाहीं साध्य तर त्यास हाहोन उतमप्रकारे हमवार करितील. जाणीजे. छ मार.

¶*Balaji Bajirao orders Trimbak Suryaji, in reply to the latter's representation, to complete the conquest of Jawhar and Ramnagar with the help of the artillery under the command of Muzaffar Khan. The Peshwa writes that more troops have been sent for that purpose under Nana Purandare. This letter contains a clear date and enables one to fix several other letters, in point of time, which refer to the same episode—the conquest of Jawhar.*

# Index to Selection No. 40

## *Miscellaneous Papers of Peshwa Balajirao*

[*Figures refer to numbers of letters*]

B—*concld.*



C



D





D—*contd.*



E



F



G

G—contd



H



I



J



J—contd



K

K—*contd.*



L



M



M—*contd.*



N

N—contd



P



R



R—contd



S

S—*contd.*



S—*concld.*



T



U



V

V—*contd.*



Y



Z





BOMBAY : PRINTED AT THE GOVERNMENT CENTRAL PRESS